# मर्ढेकरांचीं पुस्तकें

ARTS AND MAN

शिशिरागम

वाङ्मयीन महात्मता

रात्रीचा दिवस

तांबडी माती

प्रस्तुत लिखाणांतील सर्व पात्रें, प्रसंग नि घटना पूर्णपणें काल्पनिक असून त्यांचा कुठल्याही व्यक्तीशीं किंवा प्रसंगाशीं यत्किंचितूही संबंध नाहीं.

या लिखाणांतून एकादी क्रांतिकारक विचारसरणी प्रसृत करण्याची किंवा समाजाला प्रगतीच्या मार्गावर एक पाऊल पुढें टाकायला लावण्याची माझी महत्त्वाकांक्षा नाहीं. मराठींत विचारवंत कादंबरीकारांची परंपरा अखंड नि उज्ज्वल आहे. त्यांनीं तें कार्य केलं आहे आणि करताहेत. शिवाय, माझ्यांत तितकी कुवतही नाहीं. फक्त जीवनाच्या एका पाउलवाटेवर भावनांचीं कांहीं विरोध—सादृश्यें दृष्टिपथांत आलीं त्यांच्या नमुन्यानुसार कल्पनेच्या मागावर शब्दांच्या धाग्यादोऱ्यांनीं हें कथानक विणलं एवढंच.

एकदोन किरकोळ गोष्टी. शेतकरी आणि हिंदुस्थानी भाषांचा उपयोग मीं केवळ वातावरण उत्पन्न करण्याच्या उद्देशानें केला आहे. त्यांतील वाक्प्रचार व व्याकरण यांकडे वाचकांनीं दुर्लक्ष करावं. दुसरं म्हणजे या पुस्तकावरून कुणीही माझ्या एकंदर जीवन-विषयक दृष्टिकोनाचा किंवा विचारांचा आणि मतांचा अंदाज बांधीत बसूं नये. नाहीं तर भाई कुमारांच्या चित्रणावरून मी कदाचित् कमालीचा प्रतिगामी आहें किंवा खेडेगांवी जीवनाच्या चित्रणावरून मी अवास्तव रहस्यवादी आहे असें निष्कर्ष निघायचे! "रात्रीचा दिवस" त्याप्रमाणें "तांबडी माती" वाचतांना वाचकांनीं नाट्यमूल्यांचा विसर पडूं देऊं नये.

'तांबड्या माती'चं हस्तलिखित गेल्या वर्षी कलकत्त्यांत तयार होतं तें या वर्षी प्रसिद्ध होत आहे. सध्यांच्या परिस्थितींतही तें आपुलकीनें छापून प्रसिद्ध करण्याचें श्रेय श्री. दा. ना. मोघे यांसच आहे. आणि त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

— मर्ढेकर

# आमचें प्रकाशन

## कादंबऱ्या

तांबडी माती — बा. सी. मर्ढेकर
अंधारांतली वाट — बा. भ. बोरकर
काश्मिरी गुलाब — प्रो. फडके
कुलाब्याची दांडी — ,,
दौलत (सं. आ.) — ,,
रिकामा देव्हारा — खांडेकर
सुखाचा शोध — ,,
दिव्यचक्षु — कु. रत्नप्रभा रणदिवे
आंधळा न्याय — वि. वा. पत्की
समरांगण — म. भा. भोसले

## लघुकथा

दत्तक व इतर गोष्टी — खांडेकर
विद्युत्प्रकाश — ,,
पाकळ्या ( २ री आवृत्ति ) — ,,
परिस आणि लोखंड — शं. गो. गोखले
विश्रांति — प्रो. भा. म. गोरे
मकरंद — कमल दीक्षित
कोंवळीं किरणें — दि. द. पाटील

## काव्य

भिकारीण व इ. कविता — मंगसूळीकर
जीवनप्रभा — द. दा. पेंडसे
संसार — सौ. संजीवनी मराठे

## संस्कृत

द्विविभूतिचरितम् — रा. वि. गोखले
बलिदानम् — लाटकरशास्त्री

## नाटकें व नाटिका

तोतया नाटककार — प्रो. फडके
जडावाची देवी — ,,
आगलावी — ,,
विदुषी — ना. धों. ताम्हनकर
मंगळागौर — ,,

## टीका, विनोद, चर्चा वगैरे

आस्वाद — प्रो. पंगु
वाङ्मयविलास — माडखोलकर
वनभोजन — खांडेकर
धुंधुर्मास — ,,
गोकर्णीचीं फुलें — ,,
प्रतिभासाधन (३ री आ.) — प्रो. फडके
साहित्य आणि संसार — ,,
वाङ्मयविहार ( २ री आ.) — ,,
मानसमंदिर — ,,
खांडेकर चरित्र आणि वाङ्मय — प्रो. मा. का. देशपांडे
कलेचीं क्षितिजें — प्रभाकर पाध्ये

## इतर

बुद्धिबलक्रीडारत्नें — हळदीकर
लघुरत्नपरीक्षा — म. ल. खांबेटे
अभिनयकला — मिरजकर
आमचे मतभेद — सात्यकी
व्यायामाचा अभ्यास — गुप्ते व गुरव

प्रकाशक : दा. ना. मोघे, कोल्हापूर.

# तांबडी माती

# तांबडी माती

## १. कुस्ती

ग्यानू पहिलवानाची कीर्ति त्या सबंध जिल्ह्यांत पसरलेली होती. गेल्या पांच वर्षांत जिल्ह्यांतल्या अनेक ठिकाणीं जाऊन तो कुस्ती खेळून आला होता आणि प्रत्येक कुस्तींत विजयश्रीनें मागें पुढें न पहातां निखालस त्याच्याच गळ्यांत माळ घातली होती. अर्थात् आपोआपच त्या जिल्ह्यांतल्या कुठल्याही गांवांतल्या आखाड्यांत उतरणाऱ्या हरएक छोट्यामोठ्या पहिलवानाची महत्त्वाकांक्षा म्हणजे एक दिवस ग्यानू पहिलवानाला चीत करायचं ही! पण अजूनपर्यंत तें भाग्य कुणाच्या पदरीं पडलं नव्हतं. आणि ग्यानू पहिलवानाची कुस्ती कुठें होणार असं समजलं कीं आसपासच्या खेडेगांवांतूनच नव्हे तर लांबलांबच्या खेडेगांवांतूनही बैलगाडीवर रात्रीचा दिवस करून जाणाऱ्या लोकांच्या उत्साहाला अजूनपर्यंत

खंड पडला नव्हता. त्यांपैकीं ज्यांनीं आखाड्यांतली तांबडी माती एकदां कां होईना पण खांद्यावरून टाकली होती ते ग्यानू पहिलवानाचे पेंच लक्ष लावून बघत आणि कधीं काळीं त्याच्यावर उलट पेंचानें मात करण्याचें मनोराज्य करीत. पण बहुतेक सर्वांचा आनंद ग्यानू पहिलवानाला कुस्ती लढतांना नुसतं बघण्यांत होता.

इतका नांवाजलेला ग्यानू पहिलवान आज पहिल्यांदा पळसखेड्यांत येणार होता. सामान्यतः खेडेगांवांतल्या जीवनांत कुस्तीचा सामना म्हणजे सार्वजनिक उत्सुकतेचा आणि आनंदाचा प्रसंग. त्यांत ग्यानू पहिलवानाची कुस्ती! अर्थात् पळसखेड्यांत त्या दिवशीं जिकडे तिकडे पर्वणीचं वातावरण पसरलं असल्यास नवल काय? खांद्यावर काळी घोंगडी, हातांत एक सोटा, आणि डोक्यावर जुनं पुराणं तांबडं पागोटं अशा थाटांत सकाळीं पांच वाजतां शेतावर जाणाऱ्या सत्तर वर्षांच्या म्हादबापासून तों वर्ग चालू असतांना मास्तरांची नजर चुकवून खिशातले चणेकुरमुरे खायला कधींही न विसरलेल्या सात वर्षांच्या तुक्यापर्यंत सर्व गांवकरी आपल्या बोलण्यांत, वागण्यांत एकाच कुतूहलपूर्ण दंगलीची इशारत देत होते. वास्तविक पळसखेड्याची वस्ती पांचशे घरांचीही नसेल. एवढ्या लहानशा खेडेगांवांत ग्यानू पहिलवानाबरोबर आखाड्यांत नुसता उभा राहील असाही तालीमबाज मिळणं दुरापास्त! पण ग्यानू पहिलवानानें पळसखेड्यांतून जावं आणि त्याच्याबरोबर नुसती सलामी द्यायलाही कुणीं नसावं यापेक्षां पळसखेड्याला अधिक नामुष्कीची गोष्ट कोणती झाली असती? कितीही म्हातारा झाला

असला तरी तानू वस्तादांत अजून अभिमान होता. आणि बलभीम आखाड्यांतली तांबडी माती त्यानं स्वतःच्या देखरेखीखालीं तयार करवून घेतली होती. तानू वस्ताद असे पर्यंत तरी पळसखेड्याची नामुष्की व्हायची गोष्ट नको !

चार दिवसांपूर्वी ग्यानू पहिलवानाचा वस्ताद येऊन गेल्यावर तानू वस्ताद कोंडीबाच्या घरीं गेला होता तो त्याकरतांच. कोंडीबाचा मुलगा शिवा तानू वस्तादाजवळ कुस्ती शिकलेला. पळसखेड्याच्या बलभीम आखाड्यांत तानू वस्तादाचं कुणावर प्रेम असेल तर तें कोंडीबाच्या शिवावर. पंधरा वर्षांचा होईपर्यंत शिवा आखाड्यांत नियमानें जात असे. दंड जोर काढून त्यानं शरीर कमावलं होतं आणि तानू वस्तादानं त्याला कुस्तीही शिकवली होती. पण गेल्या पांचएक वर्षांत शिवावर शेतीचा भार दिवसेंदिवस अधिकाधिक पडत होता, आणि आखाड्यांत जायला त्याला पूर्वीइतका वेळ मिळत नव्हता. पण जमीन नांगरतांना, मोट हांकतांना शिवाचं कसदार शरीर ज्वानीबरोबर भरत होतं आणि वेळ सांपडेल तेव्हां तानू वस्ताद शिवाकडून कुस्ती खेळून घेत होता. ग्यानू पहिलवानाबरोबर आखाड्यांत उतरायला कोणी लायक असेल तर एक शिवाच !

“ ह्ये बघा कोंडबा, आमी तर म्हातारं झालों. पर् पळसखेड्याचं नाव राखलं पायजे नव्हं कां ? ”

“ शिवा, तानबा आल्याती पुसाया तूं ग्यानू पइलवानाबर्वर आखाड्यांत उतरायला हाइस तयार ? ”

शिवा आंतल्या घरांतून पुढच्या पडवींत आला आणि अदबीनें तानू वस्तादाला रामराम केल्यावर नेहमींच्या नम्रतेनें उद्गारला—

"तानबा म्हनूत्याती तर् उतरन कीं; पन् कुस्ती जरा इसराया झाली नव्हं कां."

"त्येची काय काळजी तुला? आजपासनं तीन दिवस आखाड्यांत ये अन् मंग बघ तुला तयार करून देतों कसा. अरे म्यां बी जरा कुस्ती पायलीय."

तानू वस्तादाच्या एवढ्या आश्वासनावर शिवा तयार झाला आणि तीन दिवसांच्या सकाळसंध्याकाळच्या तालमीनंतर आज त्याची ग्यानू पहिलवानाबरोबर कुस्ती होणार होती.

आज पळसखेड्यांत एक प्रकारची शांत धामधुम होती. कुस्तीला सुरवात संध्याकाळीं साडेपांच वाजतां होणार होती. रामपूर, भातखेडं, करणगांव वगैरे आसपासच्या खेडेगांवांतून शेंकडों लोक ग्यानू पहिलवान आणि शिवा कोंडीबा यांचा सामना पहायला लोटले होते. दुसऱ्या गांवाहून आलेल्या लोकांच्या चेहेऱ्यावर आतुरता होती तर पळसखेड्याच्या लहानथोर गांवकऱ्यांच्या तोंडावर साभिमान उत्साह, पण अंतःकरणांत न कळत भासणारी चलबिचलता होती. मारुतीच्या देवळाजवळ गाड्या सोडून उंसाच्या गुऱ्हाळावर रस पितां पितां किंवा बाजारांतल्या रामकिसन हलवायाच्या दुकानांतली रेवडी आणि शेव किंवा जिलबी खातां खातां बाहेरगांवच्या लोकांच्या तोंडीं कुठला विषय असेल तर ग्यानू पहिलवानानें मारलेल्या कुस्त्यांच्या आठवणी आणि त्याला सामना द्यायला तयार

झाल्याबद्दल शिवाची गौरवपूर्ण प्रशंसा. त्यांतली शिवाच्या प्रशंसेचीं वाक्यं ऐकतां ऐकतां शेजारीं बसलेल्या पळसखेड्यांत राहणाऱ्या लोकांच्या डोळ्यांत आशा आणि साशंकता यांची संमिश्र चमक येऊन जाई.

" दाजीभाऊ, दोन सालची गोष्ट. शेवाळच्या जत्रेंत कुस्ती झाली तवां ग्यानू पइलवानाला पइल्यांदा देखलं म्यां. अवो, हीच पांढरी खिल्लारी जोडी घेऊन गेलों व्हतो बघा, " भातखेड्याचा सांवळ्या हेरकरी रामकिसनच्या दुकानांतील शेव खात खात बरोबरच्या चार पांच इसमांना मोठ्या आवेशानं सांगत होता. " कुस्ती लागली तवा ह्यो समद्या जत्रेतल्या लोकांचा गल्बला. पन् त्या गर्दीतनं ग्येलों मुसंडी मारून अन् बघतों तर् काय ग्यानू पइलवानानं बगल मारली न् आणला कीं शेवाळच्या घम्यांला खालीं चारी मुंड्या चीत ! "

" हां, हम् भी वहां थे. बहोतही भारी पहेलवान. और क्या चलाखीसे लपेट करता है, " रामकिसन हलवाई दुसऱ्या एका घोळक्याला तळलेली डाळ देऊन परत येतां येतां उद्गारला. " लेकिन् आज तो हमारा शिवा है. और लडका बहोत तल्लख है. "

दाजीभाऊंच्या शेजारीं बसलेला अंगांत कुडतं आणि डोक्याला काळी टोपी घातलेला विठ्ठल विस्फारित डोळ्यांनीं लक्ष लावून ऐकत होता. आईला न विचारतां पैशाची जिलबी खायला आलेला उनाड तुक्या पळसखेड्याच्या अभिमानानें म्हणाला—

" शिवा बी काय कमती नाई. तयार हाअे बहाद्दर ! "

" म्यां पन् अजून ग्यानू पइलवानाला देखलं नाइ.घरधनीण सांगत व्हती शेतावर कुरणाला बांइच कुपाण घालायला होवं. पन् म्हटलं ग्यानू पइलवान इकता जवळ कुस्तीला आला तो अदुगर पाह्यचा," दुसरीकडे उंसाच्या गुऱ्हाळावर जन्याबा गुऱ्हाळवाल्याला सांगत होता.

सूर्य पश्चिमेला जरा जास्त कलला आणि पळसखेड्यांतले सर्व रस्ते आणि गल्ल्या बलभीम आखाड्याकडे बोट दाखवूं लागल्या. आणि थोड्याच अवधींत बलभीम आखाड्याच्या चारही बाजू कुस्ती पाहायला आलेल्या गांवच्या आणि बाहेरगांवच्या लोकांनीं फुलून गेल्या. कुणी खिशांत आणलेली तंबाखू स्वतः खात व दुसऱ्याला देत होते तर कुणी डोक्यावरचं पागोटं नीट आहे कीं नाहीं हें हात लावून पहात होते. कुणी कुस्ती दिसावी म्हणून खांद्यावर बसण्यासाठीं उतावीळ झालेल्या आपल्या मुलाला धीर धरायला सांगत होते तर कुणी झाडांच्या फांद्यांवरून कुस्ती चांगली दिसेल म्हणून स्वतः झाडांवर चढण्याच्या प्रयत्नांत होते. पिकलेल्या चिंचा आणि कैऱ्या खात खात परस्परांवर साली, कोया व चौक्या फेंकीत भांडणाऱ्या लहान मुलांच्या गडबडींत अधिक वयोवृद्ध लोकांची आगामी हंगामाची चर्चा आणि दगडू इनामदाराच्या काडीमोडीचा इतिहास यांची सरभेसळ होत होती. पण बाह्य व्यवसायांच्या या विविध वैचित्र्यामागें जर एक कुठली अमूर्त भावना सरसकटपणें लपली असेल तर ती कुतूहलपूर्ण उत्कंठेची. खेडेगांवच्या लोकांच्या सामान्यतः प्रसंगशून्य सामाजिक जीवनांत, साध्या उत्साहालाही

उत्सवाचं स्वरूप देणाऱ्या सामुदायिक मनाचं तें उत्कंठापूर्ण दृश्य खरोखरच मनोहर होतं.

त्या सर्व दृश्याचा ध्रुवबिंदु जो शिवा तो नुकताच कपडे घालून बलभीम आखाड्याकडे यायला निघत होता. देव्हाऱ्याच्या कोपऱ्यांत असलेल्या भवानीला त्यानें नमस्कार केला आणि जवळ उभ्या असलेल्या आपल्या म्हाताऱ्या आईच्या पायांवर डोकं ठेवून, तिचा आशीर्वाद घेऊन तानू वस्तादाबरोबर तो घराबाहेर पडला. त्याच्या नसांनसांतून एक प्रकारच्या अभिमानाचं स्फुरण, श्रद्धेचा आत्मविश्वास उसळत होता. पण त्याबरोबरच ग्यानू पहिलवाना-बरोबर कुस्ती आहे या विचारानें त्याच्या अंतःकरणांत थोडी चल-बिचलता येई. तोंडांत बोटं घालून मोठ्या डोळ्यांनीं आणि छोट्या विजयाकांक्षेनें पाठीमागून येणारीं पोरं आणि कौतुकानें रामराम करणारे मोठे गांवकरी यांच्याकडे फारसं लक्ष न देतां तानू वस्ताद आपल्या शिष्याला प्रोत्साहन देत होता.

"बस्स् कालच्या दिन जो पेंच दाखवला म्यां तो ध्यानांत धर. म्यां बी ग्यानू पइलवानाला लढतांना अक्षी देखला हाय. अन् त्या पेचावर काय बिशाद हाय तो मात करील!"

पण शिवाचं आपल्या वस्तादाच्या सल्ल्याकडे फारसं लक्ष नव्हतं. त्याचं साधं मन मारुतीची प्रार्थना आणि आईची आठवण यांनीं व्यापलं होतं.

बलभीम आखाड्याजवळ आल्यावर तो आणि तानू वस्ताद आखाड्याच्या खोलींत गेले. ग्यानू पहिलवान व त्याचा वस्ताद अगोदरच तेथें आले होते, आणि ग्यानू पहिलवान लंगोट आणि

त्यावर पांढरी शुभ्र चड्डी चढवून आखाड्यांत उतरत होता. तो आखाड्यांत उतरल्याबरोबर सर्व प्रेक्षकांचं लक्ष त्यानें वेधलं. आखाड्यांतली तांबडी माती हातांत घेऊन अंगाखांद्यावर टाकीत विजयाच्या पूर्ण विश्वासांत तो आपल्या पेटींत आणि मस्त पहिल-वानी गुर्मीत पिंजऱ्यांतल्या वाघाप्रमाणें आखाड्याच्या चौकोनी मर्यादेंत इकडून तिकडे अधीरतेनें फिरत होता. इकडे खोलींत शिवानें अंगावरचे कपडे उतरले आणि बलभीम आखाड्यांतल्या तांबड्या मातीनें ज्यावर दाट काळसर तांबडा रंग चढवला होता असा लंगोट हृदयाचे ठोके ऐकत बांधला. प्रथम एक दोन जोर बैठका काढून त्यानें खोलींतल्या मारुतीच्या तसबिरीकडे क्षणमात्र टक लावून पाहिलें आणि लगेच तसबिरींतल्या मारुतीच्या पायांना स्पर्श करीत हलक्या आवाजांत ' जय बजरंग बली ' म्हणून व तानू वस्तादाचा हात हातांत घेऊन तो खोलीच्या बाहेर पडला आणि आखाड्यांत उतरला. त्याबरोबर सर्व लहानथोर खेडेगांवकऱ्यांतून एकच स्वागत-पूर्ण कल्लोळ उठला आणि क्षणार्धांत तो सर्व प्रेक्षकवृंद आतुरतेनें निश्चल झाला.

ग्यानू पहिलवान आणि शिवा यांची आखाड्यांतली ती जोडी अपूर्व होती. काळ्याकभिन्न पण कमावलेल्या साडेपांच फूट उंचीच्या देहाचा ग्यानू पहिलवान विजयोन्मादाच्या बेहोष बेफिकीरींत पवित्रा घेत होता. आजपर्यंत चीत केलेल्या अनेक कुस्ती खेळणाऱ्यांच्या तेजोभग्न चेहेऱ्यांचीं अस्पष्ट स्मृतिचित्रें त्याच्या रोमरोमांतून ओसंडणाऱ्या सगर्व तिरस्काराला पाठिंबा देत होतीं. भरलेली छाती, दंड आणि मांड्या अजिंक्य रगीची साक्ष पटवीत होते. आणि त्या

मस्त पण जरा लठ्ठ पहिलवानाच्या समोर वीस एकवीस वर्षांचा पण त्याच्यापेक्षां थोडा उंच असा शिवा उभा होता. सडपातळ नि पीळदार शरीर, शेतावर उन्हातान्हांत काम करून कणखर बनलेलं; निमसर काळा रंग, दणकट मान आणि गळ्याभोंवतीं काळा गंडा !

ग्यानू पहिलवानानें आणि शिवानें आखाड्यांतली तांबडी माती हातांत घेऊन, चुरगळून फेंकून दिली. ग्यानू पहिलवानाच्या डोळ्यांत तिरस्काराची आणखी एक छटा चमकून गेली; आणि शिवाचा प्रत्येक स्नायू एकदम टणक झाला. दोघांनीं पवित्रे घेतले, दंड ठोकले आणि सलामी दिली !

शिवाची सडपातळ मूर्ती पाहून ग्यानू पहिलवानानें नेह-मींच्या संवयीप्रमाणें पण अधिक बेफिकिर वृत्तीनें पहिल्याच सला-मींत साधी टांग घालून त्याला जमिनीवर लोळविण्याचा प्रयत्न केला. पण विलक्षण चपलाईनें शिवानें त्याच्या तावडींतून आपली सुटका करून घेतली आणि तो कोलमडत पडला. लगेच चटकन् उठून त्यानें अधिक सावधगिरीनें दुसरी सलामी दिली. त्याबरोबर सर्व खेडेकरी प्रेक्षकसमूहांतून एकच प्रचंड आवाज निघाला-- " यंव रे यंव शिवा, जीते रहो पठ्ठे ! " ग्यानू पहिलवानाला हे शब्द आणि त्यांनीं ध्वनित केलेला अनुभव अपरिचित होतीं. आपल्या मांसल शरीराकडे ऐटीनें, घमेंडीनें पाहतां पाहतां त्याला शिवासारख्या किरकोळ प्रतिस्पर्ध्यानें आपली टांग चुकवावी याची चीड आली. पण जिल्ह्यांतल्या हरएक दंगलींत कुस्ती जिंकून आलेल्या ग्यानू पहिलवानाचा उन्मादपूर्ण आत्मविश्वास दांडगा होता. एवढ्याशा

शिवाला पेचांची चतुराई दाखविण्याची काय जरूर ! नुसतं शरी-राच्या वजनानें त्याला चीत करतां येईल अशा विचार करून दुसरी सलामी होतांच ग्यानू पहिलवानानें आपलं सर्व शरीर पवित्र्यांत पण पुढें झेंपलं आणि शिवाच्या कमरेला विळखा घालून त्यानें शिवाला जमिनीवर पाडलं. पण तेवढ्यांतही चपलाई करून शिवानें पाठ चुकविली आणि तो जमिनीवर पडला तो पालथा. पडल्याबरोबर तोंडांत गेलेली माती थुंकतां थुंकतां त्यानें आखाड्यांतल्या तांबड्या मातीला जें घट्ट आवळलं तें एखाद्या घोरपडीप्रमाणें. त्याच्या सर्व शरीराचे स्नायू पूर्वींपेक्षांही अधिक टणक झाले आणि त्याचं ताठर शरीर तांबड्या मातीला जें एकदां चिकटलं तें चिकटलं ! त्याच्या पाठीवर बसून, मानेवर हात देऊन हरतऱ्हेनें ग्यानू पहिलवानानें त्याची पाठ मातीला लावायचा प्रयत्न केला. पण व्यर्थ ! शिवा आतां हरणार या भीतीनें इतका वेळ निश्चल आणि निस्तब्ध झालेला प्रेक्षकसमूह क्षणार्धांत जणूं भानावर आला. आणि शिवाची चिकाटी पाहून नव्या आशेच्या उत्साहांत अनेकमुखानें त्यानें उत्तेजनाच्या, प्रोत्सा-हनाच्या आवेशपूर्ण आरोळ्यांचा नुसता वर्षाव केला. "शाबास रे शिवा, बस रहा मुसंडी खुपसून !" "अरे, त्यो हात घ्ये काढून-शान् अन् उलट कीं पाठीवर !" "घाबरूं नको शिवा, अन् घाई नको करूंस !" "अरे नाय उलटला तर नाय पन् पाठ लावूं देऊं नको !" "त्यो चड्डी धर इकडनं—इकडनं अशी अन् पलट मार" अशा रीतीनें प्रत्येकजण आपआपल्या परीनें शिवाला सूचना देत होता. पण शिवाच्या मनःपटलावर त्यांपैकीं एकाचाही ठसा

उमटला नाहीं. त्याचं सर्व मन आणि शरीर त्यानें तांबड्या मातीला मारलेल्या मगरमिठींत एकवटलं होतं.

ती मगरमिठी इतर उपायांनीं सोडवायची ग्यानू पहिलवानाची आशा जेव्हां सफल होईनाशी झाली तेव्हां त्यानें शिवावर स्वारी भरण्याचा निश्चय केला. त्या निश्चयाचीं पूर्वचिन्हें जमलेल्या प्रेक्षकवृंदाच्या तीक्ष्ण नजरेंतून सुटलीं नाहींत. आणि क्षणापूर्वी नानाविध मोठ्या आरोळ्यांनीं शिवाला सूचना देणारा तो सारा जमाव हृदयाचा एक ठोका विसरून एकदम स्तब्ध झाला. ग्यानू पहिलवान स्वारी भरतो आहे—त्या स्वारीला लागणारी स्नायूंची टणकता परिसीमा गांठण्यापूर्वी, प्रतिक्रियेचा जोर मिळावा म्हणून किंचित्, किती निमिषमात्र, शिथिल झाली मात्र तोंच खालच्या एकाग्र अवधानपूर्ण शिवानें चित्त्याच्या चपलाईनें आपला डावा हात सोडवून घेतला, आणि डोळ्याचं पातं लवतं न लवतं तोंच त्या डाव्या हातांत सर्व जोर एकवटून त्यानें ग्यानू पहिलवानाची खालीं लवलेली मान मोडली आणि त्याला आखाड्याच्या तांबड्या मातींत उताणा पाडला व आपण त्याच्या छातीवर बसला! त्याबरोबर पंचांनीं "पाठ लागली. सोडा. शिवा जिंकला!" म्हणून निकाल दिला. "शिवा जिंकला!" "शाबास शिवा!" "भले बहादर पठ्ठे!" "पळसखेड्याचं नांव राखलं!" जमलेल्या खेडकऱ्यांच्या अभूतपूर्व विजयानंदी गगनभेदी अभिनंदनानें जमीनअस्मान निनादलं आणि सबंध जमाव उधळला!

पंचांचा निकाल कानीं पडतांच शिवा उठला आणि ग्यानू पहिलवानाशीं हस्तांदोलन करून व प्रथम आखाड्यांतल्या तांबड्या

मातीला चटकन् लवून हात लावून प्रणाम करून तो तडक आखाड्याच्या खोलींत गेला. पण अनपेक्षित विजयाच्या उत्साहानें आणि साभिमान गौरवानें भरलेल्या खेडेगांवांच्या लोकांचा तो प्रचंड जमाव त्याला थोडाच असा मोकळा सोडणार होता! खोलींतल्या मारुतीच्या तसबिरीला शिवानें भक्तिपूर्ण अंतःकरणानें अभिवादन-स्पर्श केला नसेल तोंच प्रशंसा आणि शाबासकी यांचा मोठमोठ्या आवाजांत वर्षाव करीत कित्येक खेडेकरी प्रेक्षक एकदम गिल्ला करीत त्या खोलींत शिरले. त्यांनीं शिवाला आपले कपडेही अंगावर घालण्याची फुरसत दिली नाहीं. त्यांच्यापैकीं अधिक उत्साही गड्यांनीं शिवाला एकदम खांद्यावर उचललं आणि बलभीम आखाड्यापासून तों त्याच्या घरापर्यंत त्याची मिरवणूक काढली. निरनिराळ्या उंच आवाजांच्या गर्जनांनीं सर्व पळसखेड दुमदुमत होतं! त्या कोलाहलाच्या अनेक संमिश्र शब्दांतून फक्त एकच ध्वनि निघत होता. तो म्हणजे शिवाच्या अपूर्व यशाचं अभिनंदन! शिवाची चिकाटी, शिवाची चपळाई, शिवाचा धीर, शिवाची मर्दुमकी, शिवाची बहादूरी!! शिवाच्या विजयाच्या गौरवांत स्वतःच्या विभक्त व्यक्तित्वाला विसरून बेहोष बनलेल्या खेडेगांवकऱ्यांच्या अकृत्रिम सामुदायिक मनाचा ती सर्व मिरवणूक म्हणजे एक जिवंत आणि कौतुकास्पद आविष्कार होता. त्या आविष्काराचा पळसखेड्याच्या लहानमोठ्या नव्या पडक्या घरांतून येणारा साद घेत घेत, गौरवपूर्ण गर्जनांच्या अविरत निनादांत तो समुदाय कोंडीबाच्या दाराशीं थांबला आणि या खांद्यावरून त्या खांद्यावर शिवाला झेलणाऱ्या उत्साही गड्यांनीं आपलं यशशाली ओझं खालीं उतरलं. शिवानें

एकवार त्या झुंडयांच्या झुंडयाकडे कृतज्ञतेनें हंसून बघितलं आणि त्याला उचलून मिरवणाऱ्या गडयांचे साध्या भाषेंत आभार मानले. इतक्यांत वांकडया टोपीचा तुक्या लपत येऊन शिवाच्या पोटरीला हात लावून पळून गेला आणि सर्व समुदाय हंसला !

" शाबास बहाद्दर शिवा ! आज बस्स तूं अशी मर्दुमकी गाजवलीस !" त्यापैकीं एकजण म्हणाला.

" नइ रे ! त्यांम्हा काय शे. जरा लढलों अन् वर आलों बस. बाकी काय जें झालं तें तानूबांची इच्या !" शिवानें विनयानें उत्तर दिलं.

या व अशाच अनेक छोट्या छोट्या संवादांनंतर कोंडीबाच्या घरासमोरचा जमाव हळू हळू आपआपल्या घरीं जावयास निघाला. शिवा पडवींतून घरांत गेला. अभिमान, कौतुक, गौरव यांच्या संमिश्र भावनेनें जिच्या पुत्रस्नेहाला भरती आणून आनंदाश्रूंच्या द्वारा वहावयास लावलं होतं त्या शिवाच्या माउलीनें तो पायां पडत असतां त्याला एकदम आपल्या उराशीं घट्ट धरलं. अश्रपूर्ण आवाजांतच तिनें शिवाच्या बहिणीला शेवंतीला आई भवानीची खणानारळानं सकाळीं ओटी भरायला आणि पारावरच्या मारुतीला सव्वाशेर शेंदूर वहायला सांगितलं आणि आपण स्वतः शिवाची लगेच दृष्ट काढली.

" इडा पिडा टळो अन् माझ्या शिवाला उदंड औक्ष मिळो !"

——❋——

## २. एक शीळ.

पळसखेडयांतील उंसांच्या गुऱ्हाळाचा कर् कर् आवाज चालूच होता.

दुकानाच्या मिणमिण दिव्याच्या प्रकाशांत रामकिसन हलवायाची विक्री जोरांत होत होती.

—पण हळू हळू पळसखेडयाच्या रस्त्यांत आणि गल्ल्यांत रात्रीची शांतता पसरायला लागली.

मारुतीच्या देवळासमोर सोडलेल्या बैलगाडया अदृश्य झाल्या. आणि पळसखेडयांतून चारही दिशांना करणगांव, रामपूर, भातखेडं वगैरे आसपासच्या खेडयांना जाणाऱ्या रस्त्यांवर चांदण्याच्या शुभ्र प्रकाशांत लांब लांब पळसखेडयाच्या विरुद्ध दिशेला संथपणें गाडया ओढणाऱ्या बैलांच्या गळयांतल्या घंटांचे मंद मंद निनाद आतां मैल दीड मैल अंतरावरील खेडयांत अस्पष्टपणें ऐकूं येऊन विरून जात होते.

कोंडीबाच्या घराच्या मागच्या गच्चीवर शिवा खाटलं टाकून त्यावर आपली पथारी पसरीत निजायच्या तयारींत होता. त्याची पाठ पथारीला लागली असेल नसेल तोंच शेजारच्या बजाबा पाटलाच्या पिछाडीच्या शिवारांतून एक अत्यंत मोहक शीळ त्याच्या कानीं पडली.

—*—

# ३. पेरु आणि संत्रीं

अल्लड अभिमान, भोळं सहजस्फूर्त प्रेम, आपुलकीचा पण लाजरा गौरव इत्यादि अनेक शुभाशुभ भावना आणि आकांक्षा यांनीं एका गोड गळयांतून आणि दोन तांबूस ओठांतून भीत भीत वातावरणांत गुंफलेल्या सारजाच्या त्या मोहक शिळेला उत्तर मिळालं तें दुसऱ्या दिवशीं सकाळीं.

आदल्या दिवसाच्या शारीरिक आणि मानसिक ताणानें अगोदरच विश्रांतिलोलुप झालेला शिवा दुसऱ्या दिवशीं सकाळीं नेहमींपेक्षां उशीरांच उठला. पण रात्रींच्या गार हवेंतल्या गाढ झोंपेनें त्याचा सर्व श्रमपरिहार झाला होता. आणि त्याच्या चेहेऱ्यावर नेहमींची प्रसन्नता आपोआप विलसायला लागली होती. यौवनाच्या भर उमेदीला आदल्या दिवसाच्या विजयानें उत्पन्न केलेला नवा आत्मविश्वास न कळत वृद्धिंगत करीत होता. आणि शिवाच्या प्रत्येक हालचालींत या नव्या हुरुपाचं प्रतिबिंब पडत होतं. आपली पथारी आणि खाटलं त्यानें उचलून ठेवलीं आणि तो खालच्या घरांत आला. आज उशीरां उठल्याबद्दल त्याला कुणींच बोलणार नव्हतं. पण शेतावर जायला झाला त्यापेक्षां अधिक वेळ करण्याची त्याची इच्छा नव्हती. शिवाय गेले तीन चार दिवस त्याला शेताकडे बघायला मिळालं नव्हतं. आणि

कोंडीबा कांहीं झालं तरी पन्नाशी उलटून गेलेला. तेव्हां त्याला शेतावरलीं मेहनतीचीं कामं आतां किती वेळ करतां येणार! त्यामुळें खालीं आल्याबरोबर शिवानें प्रातर्विधी आटोपून शेवंतीनें भरून आणलेला ताजा दुधाचा प्याला घेतला व लगेच मोटीचं दोरखंड खांद्यावर टाकून तो शेतावर जायला निघाला.

पहाटेचा गार वारा आणि पक्ष्यांच्या किलबिलाटानें भरलेलं वातावरण! बैलगाड्यांच्या चाकोरी रस्त्यावरून हळू हळू शिवा शेताकडे जात होता. त्याच्या प्रसन्न चेहेऱ्यावर सकाळच्या वाऱ्यानें आणि चालण्याच्या व्यायामानें अधिकच तजेला चढला होता. साधारण कोसभर शिवा चालून गेला नसेल इतक्यांत मागून एका मोठ्या बैलगाड्याचा आवाज त्याच्या कानीं आला. रस्त्याच्या चाकोऱ्यांवरून आतांपर्यंत चालत असलेला शिवा साहजिकच त्या बैलगाड्याला वाट करून देण्याकरितां बाजूला झाला. पण बैलगाडा जो आला तो त्याच्या समोरच उभा राहिला. आणि त्यांतून बजाबाच्या सारजानें जरा गोंधळलेल्या स्वरांत त्याला म्हटलं—

"गाडींत बसाया या कीं. आमी पन् मळ्यालाच जातुय पाटलांची न्यहारी घेऊनश्यान्."

पळस खेड्यांत कोंडीबा आणि बजाबा यांचीं घरं जशीं शेजारीं होतीं तशीच पळसखेड्याच्या जमिनींत त्या दोघांचीं शेतं आणि मळे फक्त कुंपणाच्या किंवा बांधाच्या अंतरावर होतीं. पूर्वीपासून दोनही घराण्यांचा असलेला सलोखा परस्परांच्या जमिनींच्या या सान्निध्यानें अधिकच घट्ट झाला होता. जमीन नांगरणं, पिकांचीं

लागवड, पेरणी, वेंचणी वगैरे शेतकऱ्यांच्या जीवनांतल्या अनेकविध प्रसंगांत आणि कार्यक्रमांत बजाबा पाटलाच्या आणि कोंडीबाच्या शेतावर खपणारी कामकरी मंडळी कधीं चुरशीनें तर कधीं परस्पर सहाय्याच्या सहानुभूतीनें पण सदैव आनंदानें मिळत मिसळत. आणि बजाबाच्या पेरूच्या बागेंत पाट वहावणाऱ्या बायकांच्या गाण्याला शेजारच्या कोंडीबाच्या संत्र्यांच्या मळ्यांत बांध धरणाऱ्या समवयस्क शेतकरणींकडून साद आला नाहीं असं क्वचितच होत असे.

बजाबा पाटलाची न्यहारी घेऊन जाणाऱ्या बैलगाड्यांत शिवा आणि सारजा एकटींच होतीं. शिवा गाडयांत चढल्यावर त्याची आणि सारजाची जवळून दृष्टीला दृष्टी भिडली. नंतर बोलली प्रथम ती सारजा.

"काल तर् तुमी लई बहादुरी गाजवली नव्हं कां!" डाव्या हातानें डोकीवरचा पदर ओढून त्यानें आपलं हंसरं तोंड जास्तच झांकीत लाजऱ्या अभिमानानें आणि कौतुकानें सारजा उद्गारली. शेतकऱ्याच्या साध्या विनयवृत्तीनें शिवा फक्त हंसला.

"काय समद्यांचा जमाव तुमामागती! जनूं काय कोन्या देवाची मिरवणूक! आतां काय बा तुमी तर मोठं पइलवान झाल्याती. आमा गरीबास्नी पुसनार व्हय!" सारजानें विनोदी नजरेनें शिवाला चिडवण्याचा प्रयत्न केला.

"हां, त्यें बी खरं हाय. आपुन नाइ खिजवनार तर कोन खिजईल आमास्नी बी!" शिवा उत्तरला.

" कां ! तो सोनूशेटचा तुक्या हाय कीं !"

सारजानें हें वाक्य उच्चारतांच ती आणि शिवा एकदम मोठ्यानें हंसलीं. नंतर सारजानें विचारलं—

" ग्यानू पइलवानाशीं कुस्ती खेळूनशान् नांव केलत् पर आमास्नी काइ दाळरोटीची पंगत बी नाय द्यायची व्हय! आवत्या पुनवला म्हटलं पंगत होयाला पाइजे."

" पंगत मागायची ती आईपास्नं नाइ तर शेवंतीपास्नं !"

" हां ह्ये लइ! आईचान् शेवंतीचा भर्वसा खरा, पन् कुस्ती मारलीय तुमी !"

" तर काय म्यां दाळरोटी करून घालूं व्हय ?"

" नाइ तर बाईल आना न्..."

पण सारजाचं तें वाक्य संपायच्या आंतच तिच्या आणि शिवाच्या हृदयांत एक अस्पष्ट पण आशाकुल भावना कंपित होऊन गेली. आणि सारजेच्या वाक्याची पूर्ती आणि शिवाचं उत्तर शब्दांऐवजीं डोळ्यांत व्यक्त झालं. त्यानंतर तरल भावनांची प्रतिक्रिया म्हणून त्यांचं सगळं भाषण साध्या नित्याच्या गद्यगोष्टींनीं भरलं होतं. थोडयाच वेळानें त्यांचा बैलगाडा कोंडीबाच्या संत्र्याच्या मळ्याजवळ आला. तेथें शिवा खांद्यावर मोटेचं दोरखंड घेऊन खालीं उतरला आणि तो बैलगाडा सारजाला आणि बजाबा पाटलाच्या न्यहारीला घेऊन पुढच्या बिध्यांतल्या बजाबाच्या पेरूंच्या बागेंत शिरला.

इकडे शिवा आपल्या संत्र्याच्या मळ्यांत ठरलेल्या कामाला लागला. मळ्यावर देखरेख करणाऱ्या गडयानें शिवा आला असं

पाहातांच छपराखालच्या बैलांच्या जोडीपुढचं गवत दूर केलं आणि खुंट्याचे दोर सोडून ती बैलजोडी शिवाच्या स्वाधीन केली. शिवानें डोकीचं पागोटं आणि अंगांतलं कुडतं काढून मोटेच्या बाजूला ठेवलं आणि गड्यानें आणलेली बैलजोडी मोटेला जुंपली व संत्र्यांला पाणी देण्याकरितां मोट चालू केली. दोन तीन मोटा ओढल्यावर थोड्या वेळापूर्वी शिवाला जाणवणारी गोड विमनस्कता शारीरिक श्रमानें येणाऱ्या उत्तेजनाबरोबर नाहींशी झाली. हळूहळू भोंवतालच्या लहानमोठ्या हिरव्या–नारिंगी संत्र्यांच्या भारानें लवलेल्या झाडांकडे बघत बघत; "ये ऽऽ रं माऽझ्या मोऽऱ्या" म्हणून योग्य वेळीं ललकारी देऊन मोटेच्या बैलांना आळवीत; भरलेल्या मोटेंतलं पाणी रिकामं होत असतांना त्याच्या खळाळणाऱ्या आवाजाचं श्रुतिमनोहर संगीत ऐकत ऐकत व मागें वळून त्या फेंसाळ दृश्या-कडे पाहात पाहात; या वाफ्यांना पाणी मिळालं का, तो पाट बरोबर धरला का इत्यादि प्रश्नांची मधून मधून खैरात करीत शिवा न कळत आपल्या शेतकरी जीवनक्रमांत पूर्णपणें रमून गेला.

शेतकरी म्हणजे कसदार काळ्या जमिनीचीं लेकरं! त्यांचं जीवन म्हणजे या नाहीं त्या स्वरूपांत धरणीमातेची सेवा करणं आणि कृतज्ञतेनें तिच्या विशाल पण क्वचित् दुराराध्य औदार्यांतून पोटाला घांस आणि अंगाला वस्त्र मिळवणं! कुठल्या मातेचीं सगळींच लेकरं सारखीं असतात? पण चांगल्या किंवा वाईट, धरणीमातेच्या सगळ्या लेकरांचीं हृदयं प्रत्यक्ष श्रमांनीं विणलेल्या पाशांनीं काळ्या जमिनीशीं इतकीं तन्मयतेनें निगडित झालेलीं असतात कीं त्यांना भावनांच्या तंद्रींतच कार्यशून्यतेनें फार वेळ

राहाणं शक्य नसतं. शेतकरी जीवनांतील ही गोष्ट पुरुषांच्या बाबतींत जितकी खरी असते तितकीच स्त्रियांच्या बाबतींतही खरी असते. आणि त्यामुळेंच शेतकरी जीवनांत भावनांचा आविष्कार जेव्हां दृष्टीस पडतो तेव्हां त्याचं सौंदर्य कांहीं विलक्षणच असतं असं नाहीं कां ?

सुप्त रूपानें आजवर वाढत असलेल्या प्रीतीच्या पहिल्या स्पष्ट जाणीवेची मोहिनी सारजेलाही वाटली, पण बजाबाच्या पेरूच्या बागेंत तिला नित्याप्रमाणें खपायला काम होतंच. पण सकाळचा कामाचा हप्ता संपतांच तिनें बजाबाला न्यहारी दिली आणि आपणही घेतली; आणि नंतर पेरूंच्या झाडांवरून थोडे उत्तमपैकीं पेरू काढले. लांबून ऐकूं येणारी शिवाची बैलांना उद्देशून दिलेली ललकारी आणि त्याबरोबरचा मोटेचा आवाज जेव्हां थोडा वेळ थांबला तेव्हां शिवानें मोट सोडली असली पाहिजे अशी तिची खात्री झाली आणि झाडावरून काढलेले पेरू लुगड्याच्या घोळांत घालून ती कोंडी-बाच्या संत्र्यांच्या मळ्यांत आली. तोंपर्यंत शिवानें मोटेचे बैल सोडून ते गड्याजवळ दिले होते. त्याचीही विश्रांतीची आणि न्यहारीची वेळ झाली होती. बैलांना पाणी पाजून त्यांच्यापुढें गवत ठेवण्याची सूचना त्यानें गड्याला दिली आणि आपण न्यहारीपूर्वी एकदां सगळ्या झाडांना नीट पाणी पोहोंचलं किंवा नाहीं हें पाहण्यासाठीं मळ्यांत फेरी घालावयास गेला. सगळीकडे पाहणी करून, क्वचित् ठिकाणीं संत्र्यांनीं लवलेल्या झाडांना सांवरून धरण्यासाठीं दिलेले काठ्याचे आधार पक्के आहेत कीं नाहीं हें तपासून तो परत येत असता वाटेंतच सारजा त्याच्या दृष्टीस पडली. तिनें विचारलं—

" आज लइ शिणल्याती नव्हं का ! न्हेरी बिरी झाली कां व्हायची हाय ? "

" व्हायची हाय. मोट सोडली अन् जरा म्हटलं..."

तोंच शिवाची दृष्टी सारजाच्या लुगड्याच्या जड घोळाकडे गेली.

" कां तुमी न्यहारी देतां व्हय ? "

" आमची गरीबाची मीठभाकर तुमास्नी काय आवडायची तरी!" सारजानें आपल्या घोळांतलें पेरू लपवीत उत्तर दिलं.

" पन् हातची साकर हाय ना ! "

इतकं संभाषण होत असतांनाच तीं दोघेंही एकमेकांबरोबर चालत होतीं. पण संत्र्यांच्या झाडांच्या रांगांतून जातांना रस्त्यांत आलेल्या फळांनीं लवलेल्या एका फांदीला चुकवण्यासाठीं शेवटचं वाक्य बोलतां बोलतां शिवा पुढें झाला व सारजा मागें राहिली. शिवाची क्षणभर आपल्याकडे पाठ आहे असं पहातांच सारजानें लुगड्याच्या घोळांतला एक पेरू काढला आणि त्याच्या डोक्यावरून समोर पुढें पडेल अशा रीतीनें वर उंच फेंकला आणि ती उद्गारली–

" झेलील त्याचा पेरू ! "

शिवानें एकदम वर बघितलं आणि डाव्या हातानें वरच्या वर एक मोठा लुसलुशीत पेरु झेलला.

" अर्धा तुमचा अन् अर्धा आमचा ? " त्यानें विनोदानें विचारलं.

" ह्या वक्ता समदा तुमचाच ! " सारजानें हंसऱ्या डोळ्यांनीं उत्तर दिलं आणि शिवानें तोंडांत पेरूचा बोकणा भरला !

" बजाबाचं पेरू लइ ग्वाड हायती कीं. आमचीं संत्रं बी आवंदा बरीं आल्याती. गेल्या सालच्या बहाराइतकी नाइ तरी पण या सालचा बहार बी काइ कमती नाइ. हजार संत्रं येचलीं अन् अजून..." असं म्हणतां म्हणतां समोरच्या झाडावरचं एक टपोर भरलेलं संत्र काढण्याकरितां शिवानें मान उंच केली आणि हात लांब केला. सारजानेंही मान उंच केली आणि शिवाच्या हाताच्या आड येणाऱ्या फांद्या दूर करण्याचा प्रयत्न केला. त्या प्रयत्नांत अभावितपणें तिचा हात शिवाच्या हाताला लागला आणि दोघांच्या शरीरांतून एकच स्पर्शानंदाची लहर चमकून गेली.

शिवानें दिलेल्या संत्र्याच्या फोडी सोलून खात खात सारजा आणि सारजानें दिलेला पेरु खात खात शिवा अशीं दोघें मोटेच्या विहिरीकडे आलीं. विहिरीजवळ आल्यावर शिवा म्हणाला—

" बजाबाचे पेरु लइ ग्वाड. आमास्नी आनखी एक द्या कीं!"

" पोहतां येतं तुमास्नी ?" सारजानें संदिग्ध प्रश्न केला.

" कां बा ? ढकलायचा इचार हाय व्हय ?" खोडकरपणानें शिवानें उलट विचारलं.

" काइ तरी अमंगळवाणी काय बोलतां ?" सारजा किंचित् रागावली.

" बरं बा !" शिवानें सामोपचाराचा प्रयत्न केला. "माशावाणी पाण्यांत रहातो. पन् कशापायीं इचारलं ?"

" तुमास्नी पेरु पायजे ना ? ह्यो बघा हा पेरु टाकते मी इहिरींत. काढा अन् घ्या."

" टाका बरं ! "

सारजानें पेरु विहिरींत टाकला, त्यासरशीं विहिरीच्या बांधलेल्या कांठावरून शिवानें सूर मारला आणि थोड्याच वेळांत पेरु तोंडांत धरून हातानें पाणी मारीत त्यानें पाण्यावर डोकं काढून विहिरींत वांकून पाहाणाऱ्या सारजाकडे बघितलं. नंतर तो विहिरीच्या बांधलेल्या पायऱ्या चढून वर आला आणि निथळत्या ओल्या चिंब शरीरानें त्यानें सारजाला विचारलं—

" अर्धा तुमचा अन् अर्धा आमचा ! "

तारुण्याच्या भर ज्वानींत असलेल्या त्या पिळदार, तांबूस, निमसर काळया उघड्या शरीराचं, निथळणाऱ्या पाण्यानें अधिकच आकर्षक झालेलं सौंदर्य पाहतां पाहतां सारजा लाजली आणि लज्जेनें भित्रे झालेले डोळे किंचित् वर करून शिवाकडे दृष्टिक्षेप करीत ती म्हणाली—

" या खेपेला अर्धा माझा. अन् चिमणीच्या दातानं न्हाई बी दिला तरी चालल ! "

* * *

संध्याकाळ झाली आणि ज्येष्ठांतल्या पावसाची पहिली सर येऊन गेली.

बजाबाच्या शिवारांत गाईला चारा आहे कीं नाहीं हें पाहायला गेलेली सारजा क्षणभर एकटीच आकाशांतल्या ढगांनीं वेढलेल्या चंद्राकडे पाहत उभी राहिली.

———

# ४. पौषांतला चंद्र

पावसाळा आला आणि गेला.

पळसखेड्याच्या शेतांवर पिकांचं सौंदर्य बहरलं होतं आणि पळसखेड्यांत समाधानाची आणि आनंदाची छटा दिसत होती. कोंडीबाच्या शेतांतला कंबरेइतका उंच जोंधळ्याचा थवा शेजारच्या बजाबाच्या शेतांतल्या तितक्याच उंचीच्या जोंधळ्याच्या थव्याशीं हिरव्यापिवळ्या शोभेंत डुलत डुलत गोष्टी करीत होता.

आश्विनांतला एक दिवस. कोंडीबानं अंगांत पांढरं कुडतं घातलं, डोकीला तांबडं पागोटं बांधलं आणि खांद्यावर एक उपरणं टाकीत तो शिवाच्या आईला म्हणाला——

"तुमी सांगताया अन् शिवाची बी हौस हाय, तवां येतो जाऊन यकदां. पहावं काय म्हनत्याती."

आपल्या घरांतून निघून कोंडीबा शेजारच्या बजाबाच्या आवारांत शिरला. नेहमींपेक्षां आजची त्याची मनःस्थिति जरा निराळी होती. म्हणून बजाबाच्या पडवीच्या दृश्यानें त्याच्यावर विलक्षण परिणाम केला. पडवींतल्या दिव्याच्या आणि घराच्या दारांतून पडणाऱ्या आंतल्या दिव्याच्या परस्परछेदक प्रकाशित भागांत पडवीच्या पायऱ्या स्पष्टपणें दिसत होत्या. पडवींतल्या एका भागांत मिणमिण दिव्याच्या प्रकाशांत बजाबा खाट टाकून बसला होता.

दुसऱ्या लांबच्या भागांत अंधुकलेल्या प्रकाशांत जुन्या नांगरांचे फाळ, औतं, वाळून कडक झालेलं फाटक्या मोटेचं कातडं वगैरे शेतीच्या साधनांचा ढीग होता आणि त्यांच्याच जवळ शेणानें सुंदर सारविलेल्या धान्याच्या पुरुषाएवढ्या उंच कणग्या होत्या.

कोंडीबाला पायऱ्यांवर बघतांच बजाबा पाटलानें त्याचं नेहमींच्या स्नेहानें स्वागत केलं.

"राम राम कोंडीबा. या कीं. सारजा जरा तंबाखू आन."

पण कोंडीबाच्या चेहेऱ्यावरून आणि आवाजावरून बजाबानें ताडलं कीं तो आज कांहीं नुसता नित्याच्या संवयीप्रमाणें शिळोप्याच्या गप्पा मारण्याकरितां आला नव्हता. थोड्याच वेळांत ते दोघे आपसांत एक प्रकारच्या आनंदी गंभीरतेनें बोलूं लागले. आणि कांहीं वेळानें बजाबानें सारजाच्या आईला हांक मारली.

"आल्यें कीं...काय हाय..." असं म्हणत सारजाची आई दारांत येऊन उभी राहिली.

"ह्ये कोंडीबा आल्याती सारजाला मागणी घालाया शिवासाठीं."

अंतर्मनांत ज्या गोष्टीचं सारजाची आई कित्येक वर्षं मनोराज्य बांधीत आली होती, शेजारणी शेजारणींनीं ज्या घटनेची पूर्तता मूकपणानें जवळजवळ गृहीत धरली होती त्या घटनेला अनुमति द्यायला तिला कितीसा वेळ लागणार होता.

"सारजा, इकडं ये कीं." तिनें हांक मारली.

"काय जी?"

"कोंडीबा तुला इचाराया आल्याती कीं तूं शिवाची..."
पण आपल्या आईचं वाक्य पुरं व्हायच्या अगोदरच बाहेर आलेली

सारजा " मला नाय ठावं " असं लाजऱ्या आवाजांत म्हणून एकदम आंत निघून गेली.

" आवंदाच्या मार्गेसरांत... " कोंडीबा बजाबाशीं आणि सारजाच्या आईशीं बोलत होता.

* * *

आकाशांत पश्चिमेला पौषांतली द्वितीयेची चंद्रकोर दिसत होती.

त्या चंद्रकोरीकडे सारजानें बघितलं तें कोंडीबाच्या घराच्या मागच्या गच्चीवरून आणि तेंही तिनें एकटीनें नाहीं!

—*—

# ५. तुरुंगाच्या बाहेर

पंजाबमधल्या एका प्रसिद्ध तुरुंगांत १९४१ सालच्या जून महिन्यातला २४ वा दिवस उगवत होता. तुरुंगाच्या सभोंवतीं बांधलेल्या उंच दगडी तटाच्या आंत निरनिराळ्या कोठ्यांतून वार्डरांच्या हुकुमाबरोबर बाहेर पडलेल्या कैद्यांच्या पायबेड्यांचे सरमिसळ तालबद्ध आवाज चोहोंकडून ऐकूं येत होते. पण ' अ ' वर्गाच्या राजकीय कैद्यांसाठीं राखून ठेवलेल्या एका खास कोठडी-पासून ते इतके लांब होते कीं त्यामुळें भाई कुमार आणि भाई चरणसिंग यांचा निद्राभंग अजून झाला नव्हता. हिंदुस्थानांतल्या कम्युनिस्ट पक्षाचे भाई कुमार आणि भाई चरणसिंग हे दोन प्रमुख कार्यकर्ते होते. दोघेही विद्यार्जनार्थ परदेशगमन करून आलेले होते, आणि त्यांची मैत्रीही जमली ती ते दोघे परदेशांत असतांनाच. भाई कुमार वास्तविक वैद्यकशास्त्राचा अभ्यास करावयास गेलेला. पण एका सुटींत तो रशियांत पंधरा दिवस काढण्याकरितां गेला असतां मॉस्कोच्या रेड स्क्केअरमध्यें त्यानें एक भाषण ऐकलं. त्या भाष-णानें तो इतका मंत्रमुग्ध झाला कीं तेव्हांपासून समाजसत्ता-वादानें त्याच्या मनाची विलक्षण पकड घेतली. त्यानंतर हळू हळू वैद्यकशास्त्राचा त्याला कंटाळा येऊं लागला. सबंध समाजाची आर्थिक पुनर्घटना झाल्याशिवाय आपण कितीही जरी वैद्यकशास्त्र

शिकलों तरी त्याची समाजाच्या व्यापक हिताच्या दृष्टीनें काय किंमत ? आपल्या वैद्यकीय शास्त्राचा आणि कौशल्याचा समाजाला खरा फायदा व्हावयाचा असेल तर तो समाज प्रथमतः आर्थिक समतेच्या भक्कम पायांवर उभा राहावयास नको कां ? हा विचार रात्रंदिवस कुमारच्या मनाला चैन पडूं देईना. शेवटीं त्यानें निश्चय केला कीं कांहीं झालं तरी त्याचं आद्य कर्तव्य म्हणजे समाजसत्ता-वादाची घोषणा करून हिंदुस्थानच्या राजकीय आणि सामा-जिक क्रांतीला जोरानें हातभार लावायचा. सहाजिकच निरनिराळ्या समाजसत्तावादी संस्थांत, अभ्यासमंडळांत जाणं त्याला अपरिहार्य झालं. कित्येकदां तर रशियांतील आपल्या अनुभवांचं दणदणीत वर्णन करतां करतां संध्याकाळीं एकत्र जमलेल्या समाजसत्तावादी मित्रमंडळींना त्यानें रात्रींच्या रात्री जागवलं होतं. कारण वक्तृत्वाची त्याला ईश्वरी देणगी होती आणि जमलेल्या मंडळीपैकीं घरीं जावयास कुणी फारसं उत्सुक नव्हतं. मार्क्सच्या ग्रंथांचं संपूर्ण सार त्याला आकलन झालं होतं कीं नाहीं हा प्रश्न एकवेळ कुणी विचारूं शकेल; पण मार्क्स, एंजल्स्, लेनिन, ट्रॉट्स्की यांच्या विचारसरणींचा परस्परसंबंध त्याच्या तोंडून ऐकणं म्हणजे एक वैचारिक मेजवानीच होती याबद्दल मात्र त्याच्या मित्रमंडळींत दुमत नव्हतं. कारण कुमारच्या मनोभूमिकेंत कम्युनिझमच्या अपरिहार्यते-बद्दलचा दृढ विश्वास पूर्णपणें बाणला होता. त्यामुळें त्याचें विवेचन उत्तेजक होई.

वरिष्ठ सरकारी नोकरींतून सेवानिवृत्त होतांना अभावितपणें सांचलेल्या पुंजीमुळें एका बँकेच्या आणि एका विमा कंपनीच्या

बोर्डावर काम करणं भाग पडलेल्या रावबहादुर कुमारांना आपल्या मुलानं स्वतःच्या आयुष्याची नासाडी केली असं वाटलं. त्या धक्क्यामुळेंच केवळ रावबहादुरांचा अंत झाला असं म्हणणं अतिशयोक्तीचं होईल. पण त्यांचा अंतकाल जवळ आणण्यांत त्या धक्क्याचा अगदींच भाग नव्हता असं खात्रीलायक म्हणणं धाडसाचं होईल. तरीही मरणकालीं रावबहादुरांनीं केवळ अपत्यस्नेहानेंच मुलाला क्षमा केली. आणि आपल्या इस्टेटीचा वारसा दुःखद अंतःकरणानें त्याला दिला. वडिलांच्या मृत्युमुळें आणि समाजसत्तावादाचीं मूलभूत तत्त्वें आत्मसात् करून झालीं असल्यामुळें भाई कुमार परत स्वदेशास यावयास निघाला. बोटीवर चढण्याच्या कांहीं दिवस अगोदर तो आणि त्याची फ्रेंच कम्युनिस्ट मैत्रीण पोलेत्त एका चहाच्या दुकानात बसून गप्पा मारीत होतीं.

"तूं गेल्यावर तुझी आम्हांला फार आठवण होईल, कुमार."

"मलासुद्धां तुमची फार आठवण होईल. आपल्या बरोबरच्या सहली, रात्रीचे वादविवाद!"

"काय करणार तूं हिंदुस्थानला गेल्यावर?"

"अजून नक्की नाहीं."

"आपण जगाच्या सर्व भागांतून कम्युनिझमचा प्रचार केला पाहिजे; आणि जागतिक क्रांति झाली म्हणजे निरनिराळ्या देशांतून आपण एकमेकांशीं हस्तांदोलन करूं."

हिंदुस्थानांत आल्यावर भाई कुमारानें मजूरांच्या चळवळींत भाग घ्यायला सुरवात केली. कॉंग्रेस सोशलिस्ट पक्षाचा तो सभासद

झाला; आणि दुपारचं जेवण कुठं मिळेल याची वडिलांच्या कृपेनें विवंचना करण्याची जरुरी उरली नसल्यामुळें राजकीय घडामोडींना त्यानें स्वतःला निस्पृहतेनें निरपेक्षतेनें वाहून घेतलं.

चढाओढीच्या जीवनकलहांत आर्थिक विषमतेनें उत्पन्न झालेल्या अनंत हालअपेष्टांनीं खरं पाहिलं तर कोणत्या विचारी मनुष्याचं हृदय द्रवत नाहीं, संतापत नाहीं ? पण संवयीमुळें आर्थिक विषमता हाच ज्याचा स्वभावधर्म झाला आहे त्या हिंदुस्थानी समाजाला त्या विषमतेच्या अघोर अन्यायांची जाणीव असेल तर ना ! किंवा कदाचित् ती जाणीवही असेल. पण मार्क्स ते स्टालिन-पर्यंतच्या विचारवंतांनीं त्याची केलेली मीमांसा त्याला अजून अवगत नव्हती. तेव्हां प्रथम ती मीमांसा आणि तदनुरोधानें प्रचलित समाजशासनाची उलथापालथ करण्याचें उज्ज्वल ध्येय डोळयांपुढें ठेऊन आणि आपल्या क्रांतिकारक मोहिमेचं लोण समाजाच्या सर्व थरांत पोहोंचावं या उदात्त हेतूनें भाई कुमारांनीं कॉंग्रेस सोशालिस्ट पक्षांतल्या आपल्या कामगिरीला, पोलेत्तची आठ-वण करून, वर्तमानपत्रांतल्या प्रचाराचा दुजोरा देण्याचं ठरविलं. स्वतःजवळच्या भांडवलाला दुसऱ्या एका श्रीमंत मित्राच्या आणखी थोड्या भांडवलाची मदत घेऊन भाई कुमारांनीं “ लाल समाज ” हें दैनिक सुरू केलं. प्रस्तुतचं महायुद्ध सुरू झाल्यानंतर कांहीं महिन्यांनीं “ लाल समाजा ”त लिहिलेल्या एका “ लाल ” अग्र-लेखाबद्दल भाई कुमारांना शिक्षा झाली होती. त्यांची रवानगी त्यानंतर पंजाबांतल्या एका तुरुंगांत झाली होती. तेथेंच लाहोरच्या

एका भाषणाबद्दल अटक झालेला त्याचा मित्र भाई चरणसिंग आणि तो एका कोठडींत ठेवले गेले होते.

तुरुंगाच्या आवारांत इकडून तिकडे जाणाऱ्या व काम करणाऱ्या कैद्यांच्या पायबेड्यांनीं जरी त्या दोघां भाईंना जागं केलं नाहीं तरी कोठडींत चहा घेऊन येणाऱ्या इसमानें त्यांच्या गुलाबी झोंपेचा शेवट केला. भाई चरणसिंग कुमारच्या अगोदर उठले. आणि त्यांनीं कुमारला हांक मारून चहा आल्याची वर्दी दिली. प्रचलित राजकारणाच्या चर्चेंत, जर्मनी आणि रशिया यांच्या मित्रत्वाच्या करारानें उद्भवलेल्या प्रश्नांची छाननी करण्यांत, हिंदुस्थानच्या प्रस्तुत युद्धांतील जबाबदारीचें विश्लेषण करण्यांत व ब्रिटिश सरकारच्या धोरणाचा समाचार घेण्यांत भाई कुमार आणि चरणसिंग यांचे तुरुंगांतले दिवस राजकीय विचारांच्या अखंड आंदोलनांत जात असत. त्याचप्रमाणें आदल्या रात्रीं सध्यांच्या महायुद्धाची कारण-मीमांसा करतांना साम्राज्यशाही राजकारणाचे दिवस भरत आले आहेत असा निर्णय देऊन आणि हिंदुस्थानचें भवितव्य ब्रिटिश सरकारनें पुकारलेल्या युद्धाच्या यशापयशावर फारसें अवलंबून नसून उद्यांच्या जागतिक क्रांतीमध्यें हिंदुस्थान जो भाग घेईल त्यावर अवलंबून आहे अशी एकमेकांची खात्री करून देऊन ते दोघे भाई निद्रावश झाले होते. त्या वादविवादांत वैचारिक समाधान चरणसिंगापेक्षां कुमारांना अधिक लाभलं असावं असा तर्क कुमारांच्या गाढ गुलाबी झोंपेवरून कुणीं केल्यास तो फारसा वावगा ठरला नसता.

तुरुंगावरचा मुख्याधिकारी व्हाइट नांवाचा एक अँग्लो-इंडिअन होता. मनुष्य स्वभावानें मोठा दिलदार. आपल्या देख-

रेखीखालीं असलेल्या दोन सुशिक्षित आणि वजनदार राजकीय कैद्यांचा त्याला मोठा अभिमान वाटत असे. आपल्या दैनंदिन कार्यक्रमांतून वेळ काढून तो त्यांच्याशीं निरनिराळ्या विषयांवर चर्चा करीत असे; आणि रोज सकाळीं तुरुंगांत पहिली फेरी घालतांना निदान पांच मिनिटें तरी भाई कुमार आणि भाई चरणसिंग यांच्या कोठडींत तो थांबला नाहीं असं क्वचित्‌च होई. भाई कुमार आणि भाई चरणसिंग यांना पुस्तकां-खेरीज एक दैनिक वर्तमानपत्र मिळण्याची व्यवस्था केली गेली होती. पण रोजच्या ताज्या बातम्यांचा सारांश त्या दोघांनाही वर्तमानपत्र मिळण्याच्या अगोदर बहुधा मि. व्हाइटकडूनच कळत असे. आजही ते दोघे भाई तुरुंगांतल्या आपल्या बिछान्यावर बसून चहाचे घोट घेत असतांना मि. व्हाइट नित्याप्रमाणें त्यांच्या कोठडींत आला.

" नमस्कार मि. कुमार, नमस्कार मि. चरणसिंग, " त्यानें प्रातःकाळचं अभिवादन केलं.

" नमस्कार मि. व्हाइट, काय आजची खबर काय ? " चरणसिंगानें विचारलं.

" जर्मनीनें रशियावर युद्ध पुकारलं आहे. " आपल्या आवाजांतून भावनेचा यत्किंचित्‌ही परिस्फोट होऊं न देतां मि. व्हाइट उद्गारला. त्यासरशीं दोन विस्मयचकित भाईंच्या राजकारणी मेंदूंत छोटीं मोठीं स्थित्यंतरें घडून आलीं. या नव्या घटनेचे धागे-दोरे उलगडतां उलगडतां दैनिक वर्तमानपत्राचा अंक पाहण्याची

त्यांची उत्सुकता अधिकच वाढली. पण त्यांना फार वेळ वाट पाहावी लागली नाहीं. थोडयाच वेळांत तुरुंगांतल्या एका वार्डरनें दैनिक वर्तमानपत्राचा एक ताजा अंक त्यांना आणून दिला. अधीरतेनें त्या दोघांनीं तो एकदम वाचायला सुरवात केली. पहिल्याच पानावर ठळक अक्षरांत त्यांनीं ऐकलेल्या बातमीचा समग्र वृत्तांत त्यांच्या दृष्टीस पडला:

"...रोजीं उत्तरदक्षिण दीड दोन हजार मैलांच्या आघाडीवर जर्मनीनें आपल्या यंत्रसज्ज सैन्याला रशियावर चाल करून जाण्याचा हुकूम दिला असून जर्मनीच्या फौजांच्या या अफाट चढाईला तिचें वैमानिक दल जोराची मदत करीत आहे. सोव्हिएट शिपाई मोठ्या शौर्यानें लढत असून स्टालिननें..."

तो सगळा वृत्तांत भाई कुमार आणि चरणसिंग यांनीं पुनःपुन्हां वाचला. ऐतिहासिक अपरिहार्यतेच्या दृष्टीनें जर्मनी आणि रशिया यांचा झगडा आज ना उद्यां नक्की होणार याबद्दल त्या दोघांनाही शंका नव्हती. पण चार महिन्यांपूर्वीं कांहीं विशिष्ट अनुमानें सुचविणारी ती ऐतिहासिक अपरिहार्यता इतक्या झपाट्यानें आपला रंग बदलील अशी त्यांना कल्पना नव्हती.

"आतां आपला कार्यक्रम काय ठरवायचा कुमार ?" चरणसिंगानें गंभीर मुद्रेनें प्रश्न केला.

"कार्यक्रमांत बदल तर करावा लागणारच, चरणसिंग. कारण या नवीन घटनेनें सध्यां चालू असलेल्या युद्धाचं स्वरूप

आतां आमूलाग्र बदलून टाकलं आहे. हें युद्ध आतां साम्राज्यशाहीचंच आहे असं म्हणतां येणार नाहीं. आणि जागतिक मजूरवर्गाच्या दृष्टीनें मदत केलीच पाहिजे, नाहीं कां ?"

"पण रशियामार्फत जागतिक मजूरशाहीला मदत केली तरी त्या मदतीची आणि साम्राज्यशाहीशीं हिंदुस्थानांतील मजूरवर्गाच्या हिताच्या अनुरोधानें पुकारलेल्या आपल्या विरोधाची सांगड घालणं जरा कठिणच जाईल, काय ?"

"त्याबद्दल काळजी करण्याची आतांच जरूरी नाहीं. शिवाय आपल्या धोरणांत बदल घाईनें करावयाचा नाहीं. पण मला नव्या धोरणाची सकृत्‌दर्शनीं योग्य अशी तीच एक दिशा वाटली. हळू हळू नाहीं तरी सर्व गोष्टी आपोआपच निवळतील."

आणि काळाच्या ओघांत सर्व गोष्टी आपोआप निवळल्याही. स्वातंत्र्य आणि आर्थिक समता यांच्या उदात्त ध्येयानें प्रेरित होऊन, हिंदुस्थानच्या दलितवर्गाच्या उज्ज्वल भावी कालाकरितां निरलसपणें खपणाऱ्या दोन भाईंना हिटलर एकामागून एक युरोपांतले लहान मोठे देश पादाक्रांत करीत असतांना ज्या सत्याची जाणीव झाली नाहीं त्या सत्याचा लवकरच दिव्य–दृष्टीनें साक्षात्कार झाला. मार्क्स, लेनिनप्रभृति विचारवंतांनीं सम्यग् रीतीनें विशद केलेल्या आंतरराष्ट्रीय भांडवलशाहीच्या आणि साम्राज्यशाहीच्या परस्परसंबंधांच्या अनुरोधानें आतांपर्यंत हिंदुस्थानच्या युद्धकालीन राजकारणांत स्वीकारलेल्या त्यांच्या भूमिकेचा पाया विरोधविकासाच्या तर्कशास्त्रांत न कळत ढांसळला, आणि रशिया आणि जर्मनी यांच्या विरोधानें त्यांच्या राजकीय धोरणाचा नवा विकास झाला.

आपल्या धोरणाच्या या नव्या विकासाचं परस्परांच्या संभाषणांत भाई कुमार आणि भाई चरणसिंग यांनीं कांहीं दिवस सातत्यानें मनन केलं, व त्याचं निरनिराळ्या दृष्टिकोनांतून परीक्षण केलं. शेवटीं एक दिवस दुपारची शांत वामकुक्षी झाल्यानंतर भाई कुमारनें त्या विकासाला पहिलं मूर्त स्वरूप एका तारेंत दिलं.

" चरणसिंग, हा पहा तारेचा मसुदा. मला वाटतं आतां आपण कलकत्त्याला भाई अलीला ही तार करावी." तारेचा मसुदा चरणसिंगापुढें करीत कुमार म्हणाले. चरणसिंगांनीं तार वाचली:

'जर्मनीनें रशियावर केलेल्या आक्रमणानें चालू युद्धाला नवा अर्थ प्राप्त झाला आहे. साम्राज्यशाहीच्या युद्धाला जागतिक मजूरवर्गाच्या आत्मसंरक्षणाच्या मोहिमेचं स्वरूप आलं असून हिंदुस्थान युद्धबाबतींत आतां तटस्थ राहूं शकत नाहीं. तेव्हां सामान्यतः हिंदुस्थानाला युद्धप्रवण करून रशिया व ब्रिटन आणि सर्व दोस्त राष्ट्रांना मदत करण्याचं धोरण आपल्या पक्षानें स्वीकारणं जरूर आहे. तरी पक्षाच्या कार्यकारी मंडळाची विशेष सभा बोलावून या बाबतींत एक मॅनिफेस्टो काढावा. आम्ही तुरुंगांत असलों तरी तुम्ही वरील धोरणाला अनुसरून जो कार्यक्रम एकमतानें ठरवाल त्याला आमचा हार्दिक पाठिंबा गृहीत धरावा. सुटका झाल्यावर अर्थात् आम्ही आपली जबाबदारी आपल्या शिरावर घेऊंच.—कुमार–चरणसिंग.'

भाई कुमारांनीं दुसऱ्या दिवशीं ती तार मि. व्हाइटच्या हातांत दिली तेव्हां तो अधिकारी किंचित् हसला. पण लगेच त्यानें

सरकारी अधिकाऱ्याला शोभेल अशा निर्विकार चेहऱ्यानें ती खिशांत घातली.

स्वतःच्या नवीन धोरणाची कृतिनिष्ठ जबाबदारी आपल्या शिरावर घेण्याची वेळ त्या दोघां भाईंच्या बाबतींत फारशी दूर नव्हती. कारण एका आठवड्याच्या आंतच त्यांची शिक्षा संपणार होती. सुटकेच्या दिवशीं भाई कुमारांनीं मि. व्हाइटचें तुरुंगांतील वागणुकीबद्दल मनापासून आभार मानलें. त्या आभारांत तुरुंगांतील गेल्या वर्षभरांत वाढलेल्या ५-७ पौंड वजनाच्या अंधुक जाणिवेचा भाग कितपत होता हें कोण सांगू शकेल ?

भाई कुमार परत आपल्या प्रांतांत ज्या दिवशीं येणार होते त्या दिवशीं निरनिराळ्या कामगारसंस्थांच्या उत्साही कार्यवाहांनीं त्यांच्या स्वागताची उत्कृष्ट तयारी करून ठेविली होती. त्यांची गाडी स्टेशनांत येतांच त्या कार्यवाहांनीं अहमहमिकेनें त्यांच्या गळ्यांत फुलांचे हार घातले आणि सार्वजनिक स्वागताच्या नियोजित स्थलापर्यंत त्यांची मिरवणूक काढली. तेथें पोहोंचतांच शिक्षित—अशिक्षित मजूरकामगार वगैरेंच्या प्रचंड समूहानें त्यांच्या स्वागतार्थ टाळ्यांचा गजर केला. व्यासपीठावरून एकामागून एक कित्येक वक्त्यानीं मजूरवर्गाचं हित उराशीं बाळगून तुरुंगातल्या हालअपेष्टा सहन करणाऱ्या भाई कुमारांच्या निरलस समाजसेवेचं आणि स्वार्थत्यागाचं वर्णन केलं आणि आपल्या चळवळीला असा पुढारी मिळाल्याबद्दल धन्यता प्रदर्शित केली. उत्तरादाखल केलेल्या लहानच पण वक्तृत्वपूर्ण भाषणांत चालू राजकारणाचा संक्षिप्त आढावा घेऊन मजूरवर्गाच्या भावी उत्कर्षाच्या आशेवर आणि विश्वासावर तुरुंगापेक्षांही खडतर आपत्ति आनंदानें सहन करण्यांत

आपल्याला नेहमीं अभिमानच वाटेल अशी भाई कुमारांनीं ग्वाही दिली.

प्रवासाचा शीण कमी झाल्यावर भाई कुमारांनीं आपल्या व्यवसायधंद्याकडे पुन्हां एकदां लक्ष द्यायला सुरवात केली. त्यांना अटक झाल्यानंतर "लाल समाज" अर्थातच बंद पडला होता. त्याची आपल्या पक्षाच्या नवीन धोरणाच्या प्रचारासाठीं पुनर्घटना करून तो पुन्हां एकवार नियमितपणें वाचकवर्गाला सादर करण्याचं कुमारांनीं ठरविलं. त्याप्रमाणें "लाल समाज" पुनरपि रोज आपल्या वाचकांच्या भेटीसाठीं येऊं लागला. पहिल्या अंकापासूनच "लाल समाजा"च्या नव्या व जुन्या अवतारांतील फरक वाचकांच्या लक्षांत आला. त्या अंकांतील "कठोर युगधर्म" हा अग्रलेख म्हणजे "लाल समाजा"च्या या नव्या अवताराची संपादकीय पताकाच होती. युगधर्म म्हणजे काय याचें थोडक्यांत वर्णन करून त्याच्या कठोरपणाची रूप-रेषा व त्या कठोर युगधर्माच्या पताकेखालीं "लाल समाजा"नें योजलेलें आपल्या रकान्यांतून करण्याचें प्रस्तुत परिस्थितींतलें कार्य यांचें दिग्दर्शन संपादकांनीं त्या लेखांत केलें होतें. त्यानंतर "हिटलरचें आव्हान", "आमची तयारी", "जागी असून झोंपलेली काँग्रेस", "रक्ताचें मोल" या व इतर एकामागून एक आलेल्या अग्रलेखांत "लाल समाजा"नें चालू असलेल्या युद्धांत हिंदुस्थाननें तनमनधनेंकरून भाग घेण्याची आवश्यकता प्रतिपादन करावयास सुरवात केली. लेखणीच्या प्रचाराला भाई कुमारांनीं वक्तृत्वाच्या प्रचाराचीही सांथ दिली व निरनिराळ्या ठिकाणीं व्याख्यानें देऊन रशियाच्या खांद्याला खांदा लावून लढण्याची तयारी करण्याची स्फूर्ती सर्वांना देण्यांत त्यांनीं खंड पडूं दिला नाहीं.

# ६. सुलभा लिखिते

"Come in ...."

" नमस्कार, संपादक महाशय ! "

" नमस्कार, डॉक्टर, या बसा कीं. "

" ह्या सुलभा लिखिते—हे भाई कुमार. "

" नमस्कार. "

" नमस्कार.—काय डॉक्टरसाहेब ! आज इकडेशी स्वारी वळली ! बरेच दिवसांनीं आमची आठवण झाली म्हणायची ! "

" वा महाराज ! तुमचं दर्शन होण्याची संधि मिळेल तेव्हां ना ! तुमच्या व्याख्यानांच्या दौऱ्यांत तुमचा या ऑफिसांत पत्ता लागेल तर शपथ ! गेल्या आठवड्यांत मी निदान तीनदां चारदां तरी फोन केला असेल ! पण प्रत्येक वेळेला उत्तर आपली स्वारी बाहेर गांवीं गेलेली ! "

" हो, हा आठवडा जरा गर्दीचा होता खराच. कालच संध्याकाळीं मी परत आलों. काय वहिनी ठीक आहे ना ? "

" सर्व ठीक ! परवांच तुझी आठवण काढली होती आम्ही. कांहीं ऑस्ट्रेलिअन आणि ब्रिटिश वॉर कॉरस्पाँडंट्स आमच्याकडे जेवायला बोलावले होते. तेव्हां तूं यावंस अशी विमलची फार इच्छा होती. "

" कुठून पकडले वहिनींनीं हे प्राणी ? "

" आपणही त्याच मालिकेंतले आहांत म्हटलं राजश्री ! "

" म्हणूनच तर विचारतों ! "

" त्याचं उत्तर या विमलच्या जीवश्च कंठश्च..."

" लाल समाजा"च्या संपादकांच्या खोलींत वरील संवाद चालू होता. डॉ० प्रभुणेंनीं " विमलच्या जिवश्च कंठश्च " हे शब्द उच्चारतांच सुलभा लिखितेनें गोड स्मित केलं. सुलभा लिखिते ही बंगाल्यांतले प्रसिद्ध बॅरिस्टर मुकर्जी आणि त्यांची हंगेरिअन बायको यांची एकुलती एक मुलगी, प्रो० लिखिते यांची सून आणि दिवंगत डॉ० लिखिते यांची सडपातळ, उंच बांध्याची, आईकडून गोरेपणाचं वरदान घेऊन आलेली, मधोमध भांग पाडलेल्या कुरळ्या रेशमी केसांची सुस्वरूप विधवा पत्नी. सुलभेचं वय २८–३० च्या आसपास असेल. तिची आई तिच्या लग्नापूर्वींच वारली होती. यकृताच्या विकारानें त्यापूर्वीं ती वर्षभर आजारी होती. हिंदुस्थानांत त्या विकाराचं योग्य निदान कोणालाच होईना म्हणून डॉक्टरांच्या सल्ल्यानें बॅरिस्टर मुकर्जींनीं तिला शस्त्रक्रियेसाठीं व्हिएन्नाला नेलं. ती जरी मूळची हंगेरिअन असली तरी तिचे आईबाप कित्येक वर्षांपासून व्हिएन्नांतच राहात असल्यामुळें बॅरिस्टर मुकर्जींना पैशाची ददात नव्हती तरी शुश्रूषेच्या दृष्टीनें तिला व्हिएन्नाला नेण्यांत एक प्रकारचं समाधान वाटलं. व्हिएन्नांतील एक दोन प्रमुख सर्जनांकडे बॅरिस्टर मुकर्जींनीं सुलभेच्या आईला दाखविलं. त्यांनीं तिच्या यकृताचे 'क्ष' किरणांनीं फोटो काढून

शेवटीं शस्त्रक्रियेशिवाय इलाज नाहीं असं आपलं मत दिलं. त्याप्रमाणें शस्त्रक्रिया झाली. पण दुर्दैवानें विकार इतका वाढला होता कीं त्या शस्त्रक्रियेला यश आलं नाहीं आणि सुलभा आपल्या आईला मुकली. आपले सर्व प्रयत्न विफल झालेले पाहून बॅरिस्टर मुकर्जींना फार दुःख झालं. कारण त्यांचं आपल्या पत्नीवर निरतिशय प्रेम होतं. पत्नी आणि मुलगी यांशिवाय त्यांना जगांत दुसरं कोणीच प्रेमाचं माणूस नव्हतं. पत्नि–निधनानंतर अर्थात्च त्यांच्या प्रेमाचं सुलभा ही एकमेव स्थान झाली. सुलभा दिसण्यांत आपल्या आई-चीच लहान आवृत्ति असल्यामुळें तर बॅरिस्टर मुकर्जींना तिच्याकडे नुसतं बघण्यानेंही एक प्रकारचं कारुण्यपूर्ण सांत्वन लाभे. पण ह्या सांत्वनाचं समाधान त्यांना लवकरच कठोरपणें दूर लोटावं लागलं. सुलभेच्या दृष्टीनें हिंदुस्थानांत तिला नेण्यांत फारसं स्वारस्य नव्हतं; कारण स्वतः बॅरिस्टर मुकर्जी हे आपल्या व्यवसायांत गुंतलेले असणार आणि त्यामुळें तिची गृहसौख्याच्या बाबतींत हेळसांडच होणार, हें स्पष्ट होतं. तेव्हां पूर्ण विचाराअंतीं सुलभेला व्हिएन्नांतच आपल्या आजोळीं ती मोठी होईपर्यंत ठेवावं असं त्यांनीं ठरविलं व शेवटीं अत्यंत दुःखद अंतःकरणानें तिचा निरोप घेऊन ते स्वदेशीं परत आले.

सुलभा त्यावेळीं उणीपुरी तेरा चौदा वर्षांची असेल. व्हिएन्नांतल्या एका शाळेंत तिचं नांव बॅरिस्टर मुकर्जींनीं युरोप सोडण्यापूर्वी दाखल केलं होतं. त्यानंतर तिचं सगळं शिक्षण व्हिएन्नांतच झालं आणि वयाच्या विसाव्या वर्षी ती विश्वविद्यालयीन वातावरणांत पूर्ण रमलेली एक तरुणी होती. त्याच सुमारास तिची

आणि डॉ. लिखिते यांची ओळख झाली. हिंदुस्थानांतल्या वैद्यकीय अभ्यासक्रमांत आपल्या मुलानें नांव कमावलेलं पाहून प्रो. लिखित्यांनीं त्याला मुख्यतः शस्त्रक्रियेंत अधिक प्राविण्य संपादन करण्याकरितां मुद्दाम व्हिएन्नाला पाठविलं होतं. तेथें तो ज्या सर्जनच्या हाताखालीं काम करीत होता त्या सर्जनच्या मुलीची आणि सुलभेची शाळेपासून मैत्री होती आणि डॉ. लिखिते आणि सुलभा यांची पहिली गांठ पडली ती त्या सर्जनच्या घरीं एका चहापार्टींत. चहापार्टीची वेळ चारची होती तरी हॉस्पिटलमधल्या अत्यंत जरूरीच्या कामामुळें डॉ. लिखितेंना यायला अर्धा तास उशीर झाला होता. इतर आमंत्रित मंडळी तोंपर्यंत जमली असून चहाला नुकतीच सुरवात होत होती. डॉ. लिखिते खोलींत येतांच कपांत चहा ओतणाऱ्या सुलभेच्या मैत्रिणीनें सुलभेच्या समोरच्या खुर्चीकडे अंगुलिनिर्देश करून आमंत्रित मंडळींतील अपरिचितांचा परिचय करून दिला.

“ डॉ० लिखिते–मि. श्नाइडर ”

“ नमस्कार–नमस्कार ”

“ मिस् वेबर–डॉ. लिखिते ”

“ नमस्कार–नमस्कार ”

“ मिस् मुकर्जी–सुलभा मुकर्जी,–डॉ. लिखिते....ह्या तुमची देशभगिनी. ”

“ नमस्कार–नमस्कार ”

पण हा तिसरा नमस्कार करतांना डॉ. लिखितेंच्या आवाजांत विस्मय, आकर्षण, कुतूहल यांचं मिश्रण झालं होतं. कारण पाश्चात्य

पोषाखांत दिसायला तर ती हुबेहुब युरोपिअन तरुणी होती पण तिचं नांव व आडनांव हीं दोन्हींही मात्र हिंदी! हें काय प्रकरण आहे हें जाणण्याला डॉ. लिखिते फार अधीर झाले होते पण थोडा वेळ त्यांना ती अधीरता दाबून धरावी लागली! चहानंतर झालेल्या गप्पांत अर्थात् त्यांना तें कोडं उलगडलं आणि सुलभेच्या व त्यांच्या त्या प्रथम परिचयाचं क्रमाक्रमानें दाट मैत्रींत आणि नंतर प्रेमांत व शेवटीं विवाहांत रूपांतर झालं.

डॉ. लिखिते आपल्या पत्नीसह स्वदेशाला परत आल्यानंतर दोन तीन वर्षांतच दिवंगत झाले. आणि चार पांच वर्षांपासून सुलभा एक विधवा होती. मधून मधून ती जरी कलकत्त्याला आपल्या माहेरीं जात असे तरी सामान्यतः तिचा निवास सासरींच होता. सेवानिवृत्त प्रो. लिखित्यांच्या बंगल्यांत ते स्वत:, त्यांची पत्नि, आणि सुलभा अशी मंडळी होती. सासूसासऱ्यांचं सुनेवर अत्यंत प्रेम होतं आणि त्यांनीं तिला कसलीही उणीव भासूं दिली नाहीं. घरांत अथार्त्‌च तिला फारसं काम नसल्यानें तिला हवं तें करायला मोकळीक असे. घरांतलं वातावरण उदार आणि स्वतः सुशिक्षित. त्यामुळें मनोरंजक अशा व्यवसायांत तिचा सर्व वेळ जाई. लवकरच तथाकथित सुशिक्षित समाजांतील स्वतःला पुरोगामी म्हणविणाऱ्या कलोपासकांच्या आणि हौशी बुद्धिजीविकांच्या गटांतून तिचा संचार अप्रतिहतपणें होऊं लागला; आणि कुठल्याही सहानुभूतिलोलुप कलावंताला, कवीला व ज्ञानोपासकाला ती म्हणजे जरी एक देवता नाहीं तरी समजूतदार मैत्रीण वाटूं लागली. कुचेष्टा

हाच ज्यांचा धर्म आहे व निंदा ही ज्यांच्या जिभेची एक प्रतिक्षिप्त क्रिया बनली आहे अशा लोकांनीं तिला "फुलपांखरी विधवा" ही संज्ञा दिली होती. पण परिचयानें सुलभेच्या अंतःकरणाची ज्यांनीं खरी पारख केली होती त्यांना सुलभा म्हणजे अभिजात कोमलता आणि खेळकर विलासीपणा यांचं अत्यंत मनोहर, निरागस असं मिश्रण होती.

अशा लोकांपैकीं डॉ० प्रभुणे एक होते. ते आणि डॉ० लिखिते हे हिंदुस्थानांत सहाध्यायी होते. आणि दोघेही व्हिएन्नाला बरोबरच गेले होते. परत आल्यावर डॉ. लिखित्यांनीं स्वतंत्र दवाखाना काढला पण डॉ० प्रभुणे सरकारी नोकरींत शिरले. पण त्यांचा घरोबा पतिद्वयांच्या मैत्रीला पत्नीद्वयांच्या मैत्रीची जोड लाभल्यामुळें कमी व्हायच्याऐवजीं अधिकच वाढला. सुलभा राहात होती त्या शहरांत डॉ० प्रभुण्यांची बदली सुमारें वर्षापूर्वीं झाली होती. तेव्हांपासून सहाजिकच हार्दिक मैत्रीला निकट सहवासानें अधिकच जिव्हाळा आला होता. डॉ० प्रभुणे आणि त्यांची पत्नि विमल यांचें सुलभेकडे नेहमीं येणें जाणें होतें. असेच एकदां आठ दहा दिवसांपूर्वीं डॉ० प्रभुणे सुलभेचा समाचार घ्यायला आले असतां त्यांना सुलभा एकटीच दिवाणखान्यांत सचिंत बसलेली आढळली. सुलभा आणि चिंतामग्न हें दृश्य डॉ० प्रभुणेंना अगदीं अपूर्व होतं. तेव्हां ते सहज थट्टेनें म्हणाले—

"कां सुलभाताई! कसला विचार चालला आहे? भाषण आहे वाटतं कुठं!"

" नाहीं हो ! " सुलभा उत्तरली. डॉ. प्रभुणे आलेले पाहूनच तिची कळी उमलली होती. " हें बघा किनई या दिवाणखान्यांत मला नवीन पडदे लावायचे आहेत. आईनीं पन्नास रुपये एकंदर दिले आहेत. पण माझ्या आवडीचं एक कापड बघितलं आहे तें या अंदाजपत्रकांत बसत नाहीं. "

" कितीसा फरक आहे ? "

" फार नाहीं पण पंधरा रुपायांचा आहे. निदान दहा तरी."

" एवढंच ना ! मीं म्हटलं कांहींतरी शंभर सव्वाशें..."

" चिडवतां होय ! "

" नाहीं. पण पंधरा रुपयांकरितां काय एवढं चिंतामग्न होऊन बसायची जरूर ! "

" अहो, पंधरा रुपये काय पण पंधरा आणे तरी कुठून आणायचे ? "

" मी सांगतों. तुम्ही इतकीं भाषणं करतां तर एक लेख लिहून कां नाहीं काढीत ? "

" आणि विचारणार कोण आमच्या लेखाला ! डॉ. प्रभुणेनीं अजून डॉक्टरी सोडून... "

" मीच कशाला हवा ? "

" मग कोण ? " आतां मात्र सुलभा खरीच आतुर झाली.

" तें नाहीं सांगत आतांच. पण तुम्ही लेख तर तयार करा. "

डॉ. प्रभुणे आल्याबरोबर उमलायला लागलेली सुलभेची कळी या नव्या आशेनें अधिकच खुलली. त्यानंतर गप्पा चहा

वगैरे झाल्यावर डॉ. प्रभुणेनीं सुलभेला लेख लिहून झाला म्हणजे आपल्याला कळवायला न विसरण्याची सूचना देऊन तिची रजा घेतली. या सर्व प्रकरणाचा परिपाक म्हणजे डॉ. प्रभुणे आणि सुलभा लिखिते यांचं " लाल समाजा "च्या संपादकीय कचेरींत बरोबर आगमन. भाई कुमारांचं नांव सुलभेनें पूर्वी ऐकलं होतं. पण त्यांची आणि तिची प्रत्यक्ष भेट अशी त्याच दिवशीं प्रथम झाली. डॉ. प्रभुणे बदली होऊन यावयाच्या अगोदरच भाई कुमारांना अटक होऊन पंजाबांत जावं लागलं होतं. त्यामुळें डॉ. प्रभुणेंच्या किंवा विमलच्या मार्फत भाई कुमारांशीं परिचय होण्याचा योगायोग तिला येणं अशक्य होतं. " लाल समाजा "च्या कचेरींत संपादकीय खोलींत भाई कुमारांचीं व डॉ. प्रभुणेंचीं प्रास्ताविक औपचारिक प्रश्नोत्तरें झाल्यावर डॉ. प्रभुण्यांनीं भाई कुमारांना सुलभा लिखिते कोण काय वगैरे सांगितलं. नंतर ते म्हणाले--

" त्यांची तुझ्या पत्रांत कांहींतरी लिहावं अशी इच्छा आहे. खरं म्हणजे मीच त्यांना लिहिण्याचा आग्रह केला. कारण त्या आहेत जरा भिडस्त आणि विनयी. लेखनाच्या दृष्टीनें त्यांना स्वतःबद्दल विश्वास वाटत नाहीं. पण मला त्यांच्याबद्दल खात्री वाटते. आणि म्हणूनच मी त्यांना आग्रह केला. तूं नुकताच " लाल समाज " पुन्हां सुरू केलास तेव्हां म्हटलं तुला एक नवा लेखक मिळवून द्यावा. "

" वाः छान. कोणत्या विषयांची विशेष आवड आहे तुम्हांला ? "

"हें बघ, कुमार, त्यांनीं कांहीं लिहून आणलं आहे वाटतं. तें एकदां घाल नजरेखालून. आणि पहा तुला त्याचा कांहीं उपयोग करून घेतां आला तर. तुझ्या नवीन धोरणाला त्यांच्या लेखांचा चांगला फायदा होईल असं मला वाटतं. बरं आहे. झाली तुमची आणि संपादकांची ओळख, सुलभाताई? जाऊं मी आतां? तुम्ही कुमारशीं तुमच्या लेखांबद्दल आणि नवीन कल्पनांबद्दल बोला. मी दवाखान्यांत जातों आणि पांच मिनिटांत मोटार तुमच्या-करितां परत पाठवून देतों. विमल तुमची घरीं वाट पाहील. तुमचं लेखनकार्य म्हणजे संपादक, लेखक आणि आम्ही या त्रिकुटांतलं गुपीत, असंच ना?"

या प्रश्नाला सुलभेनें किंचित् हर्षित हास्यानें संपादकांकडे बघत अनुमोदनात्मक उत्तर दिलं.

"अच्छा कुमार, येतों मी तर." असं म्हणून डॉ. प्रभुणेनीं त्यांचा निरोप घेतला.

"लाल समाजा"च्या संपादकांच्या खोलींत आतां फक्त भाई कुमार आणि सुलभा लिखिते असे दोघेच होते. सुलभेनें संपादकांच्यासमोर आपण लिहून आणलेला मजकूर ठेवला. भाई कुमारांनीं तो वर वर वाचून पाहिला. त्यांच्या मनश्चक्षूंपुढें पोलेत्त आणि सुलभा यांच्या प्रतिमा परस्परांत मिसळत व अलग होत, व पुन्हां मिसळत व अलग होत अशा निमिषमात्रांत अनेक वेळां येऊन गेल्या.

"तुमची भाषाशैली खरोखरच फार आकर्षक आहे. तुम्हीं आमच्या पत्राकरितां नियमितपणें कां लिहीत नाहीं? जरा वर्तमान-

पत्राच्या दृष्टीनें पहिला पॅरा कठिण आणि जास्त गंभीर वाटतो. तो बदलायला पाहिजे. आणि या दुसऱ्या पानावरचं हें वाक्य आमच्या धोरणाशीं थोडं विसंगत आहे. पण आपल्या परवानगीनें ते फेरफार मी करून घेईन. अर्थात् आपण फारशा मोबदल्याची अपेक्षा करीत नसालच. आम्ही सामान्यतः पांच रुपयांवर कुणाला देत नाहीं. पण तुम्हांला दहा रूपये देऊं."

सुलभेनें अत्यंत निर्व्याज अशा मनाचे आभार आणि अनपेक्षित आनंदाचा जवळ जवळ बालिश उल्हास आपल्या स्मितांतून प्रगट केला. आणि नंतर पुन्हां दुसरा लेख लिहून आणण्याचं कबूल करून तिनें भाई कुमारांची रजा घेतली. "लाल समाजा"च्या संपादकांच्या खोलींतून बाहेर पडतांना सुलभेच्या पायांत एक गोड तरलता आली होती. लेखकांना आपल्या गोड स्वभावानें उत्तेजन देणारी सुलभा आज स्वतः लेखिका बनली! दिवाणखान्याच्या पडद्यांकरितां लागणाऱ्या पंधरा रुपायांचा तिला विसर पडला, आणि पैशाच्याऐवजीं कीर्तीचीं मनोहर स्वप्नें तिला अस्पष्ट कां होईना पण दिसूं लागलीं. प्रसिद्धीच्या पहिल्या उल्हासांत, हातांत लेखणी धरणाऱ्या कोणत्या व्यक्तीचं मन वेडं आणि वेडेपणानें आशावादी बनत नाहीं!

—*—

# ७. पाहिली प्रेरणा

खानबहादुर महंमद हुसेनांचा तंबू पळसखेड्याच्या वेशी-जवळच्या एका शेतांत होता. पंचवीस वर्षांपूर्वी पोलिसखात्यांत शिरलेले खानबहादुर पूर्वीच्या जमान्यांतले एक उमदे डी. एस्. पी. होते. राजनिष्ठा आणि हिंदुस्थानच्या क्षात्रतेजाबद्दलचा अभिमान या दोहोंचा त्यांच्या ठिकाणीं झालेला अपूर्व मिलाफ इतर सरकारी अधिकाऱ्यांत क्वचित्‌च दृष्टीस पडला असता. त्यामुळें डी. एस्. पी. च्या पोषाखांतील त्यांच्या पांढऱ्या केसांच्या, पाणीदार डोळ्यांच्या रुबाबदार मूर्तीचा प्रत्येकाला दरारा वाटायचा. पण त्याबरोबरच हिंदू–मुसलमानांतील भेदभाव विसरून दोघांतही तितक्याच सहानु-भूतीनें आणि समभावानें मिसळणाऱ्या खानबहादुरांनीं आपल्या प्रामाणिक स्नेहानें आणि समतोल न्यायबुद्धीनें दोनही समाजांत विश्वास आणि आदर उत्पन्न केला होता. त्यामुळें त्यांच्या रुबाबानें वाटणाऱ्या वचकाबरोबरच त्यांच्या चेहेऱ्यावरील खोल रेघांतून प्रतीत होणाऱ्या शिस्तीच्या पण आपुलकीच्या जाणिवेनें ते सर्वांना प्रिय झाले होते.

खानबहादुरांचा पळसखेड्याचा मुक्काम फक्त एकाच चौकशी-करितां होता. लिबियांतल्या मोहिमेंत पकडलेल्या इतालिअन युद्ध-कैद्यांपैकीं एक उंबेर्तो स्कालेंत्ती हा कँपमधून परागंदा झाला होता

व त्याचा पत्ता थोड्याच दिवसांपूर्वी पळसखेड्याच्या आसपास असा लागला होता. स्वतः खानबहादुरांचा एक मुलगा आफ्रिकेंत लढाईवर धाडलेल्या हिंदी पलटणींत अधिकारी होता व त्यानें आपल्या शौर्यानें डी.एस्.ओ.चा मान मिळविला होता. त्यामुळें खानबहादुरांना उंबेर्तो स्कार्लेत्तीचा तपास लावण्यांत एक प्रकारची अंधुक आत्मीयता वाटत होती; आणि तंबूबाहेरच्या शिपायानें आंत येऊन सलाम करतांच त्यांच्या तोंडावर मंद उत्सुकता प्रगटली.

" सलाम, हुजूर. "

खानबहादुरांनीं मानेनें त्या सलामाचा स्वीकार केला.

" शिवा कोंडीबा आया है, हुजूर. "

" अच्छा, अंदर लाव. "

शिपायानें क्लिक् करून आपल्या बुटांच्या टांचा जोडल्या व खानबहादुरांना पुन्हां एकवार सलाम करून पाठ फिरविली. थोड्याच क्षणांत तो शिवाला घेऊन परत आला.

" राम राम, साब. " शिवानें खानबहादुरांना अभिवादन केलं.

" राम राम, शिवा, क्यौं कैसी हालत है ? तुमने ग्यानू पहेलवानको कुस्तीमें मार दिया सुनता हूं ? बहोत अच्छा, शिवा, बहोत अच्छा. मैं अभी बूढा हो गया हूं. लेकिन् जब् तुमारेसरीका जवान था तों मैं भी कुस्ती लढता था. और तुमारे जीतका इत्तला मिलनेसे मेरेको बहोतही खुषी हो गयी. मैं तों ये खास दिलचस्पीकी और अभिमानकी बात समझता हूं के अपने खेडेगांवोंमें अभीभी तुमारे सरीके मर्द लोक पैदा होते है. "

" सायबांची किरपा हाय, " शिवानें नम्रतेनें म्हटलं.

"हमारी मेहेरबानी नहीं अल्लाकी. अच्छा बैठो बैठो. अरे खडा क्यौं रेहता?–ये देखो आज तुमको बुलाया इस् लिये के वो जो तुमने गोरा सिपाही देखा था वो कहां और कभू? और वो तुमसे मिलने के बाद कहां गया कुछ मालूम है?"

"कुठं गेला त्ये नाय ठावं, साब."

"अच्छा, जो कुच् मालूम होगा वो तो बतलाव."

"अक्षी गेल्या पुनवेची गोष्ट साब," शिवानें सुरवात केली. "दिस् जनूं खालीं गेला व्हता पन् रात व्हाया जरासा वकुत व्हता. कोंडीबादादा अन् खुरपणीच्या बाया शेतावरनं घरीं जाया निघाल्याती. मी बी निघनार पन् म्हटलं जरा खळ्यांत जाऊन यावं अन् बैलास्नी पाहून बिहून जावं. तवा रातचा शेतावर झोंपनारा गडी बी व्हता माज्यासंग. बैलास्नी मोटेवर पानी पाजलं अन् खळ्यात नेऊनशान् खुंट्याला बांधलं. अन् त्येंच्या पुढ्यांत चारा टाकून जरा पाठीवरनं हात फिरवलान्. अन् खळ्यांतनं जसा निघतोय् न कां तसा योक गोरा सायबावानी इसम आला समोर! म्यां म्हटलं या वग्ताला ह्यो कोन भूत आलंय! अन् त्येला 'काय रे बा कोन हाय तूं' म्हून हाटकलान्. पन् तो लागला विंगर्जीबिंगर्जीत बोलाया अन् आमास्नी काइ बी उमज पडना त्यो काय बोलतोय येचा. दिसाया अक्षी भूतावानी व्हता बघा, सायब! दाडीचं केस ह्ये इतकं वाढलेलं अन् डोकीवर ना टोपी ना काइ! अखेरला आमास्नी त्येची बोली उमजेना असं देखलन् तवा त्यो हातवारं करून सांगाया लागला कीं प्याया पानी होवं. म्यां गड्याकडनं

मडक्यांतलं पानी त्येला दिलं तवा अक्षी खूष झाला अन् रामराम कराया लागला. तोंडावरनं पोटांत बिचाऱ्याची लई आग व्हती असं दिसत व्हतं. पन् सायबाचा पावबिव पळसखेड्यांत काय गवसायचा व्हय! तवा गड्याला म्हटलं त्येची भाकर असेल तर दे. पन् त्यो सायब लागला पोटास अन् तोंडास हात लावाया अन् संत्र्याच्या मळ्याकडे बोट दावाया. म्यां समजलों की त्येस्नी सत्रं पायजेती अन् म्हटलं घ्ये न बाबा. तुज्यापायीं मळा काय वोस पडनार व्हय! संत्रं खाल्लयावर जनू त्येला हुशारी आलीया. तशी त्यो लागला जाया! गड्यानं अन् म्यां म्हटलं रातचा कुटं जानार तूं? घ्ये की ही पथारी अन् रातभर नीट नीज इथं अन् पहांटच्या पहरीं उठूनशान् जायचं तकडं जा. पन् आमचं बोलनं त्या सायबाला उमगलं नाइ का काय कोन जानं पन् त्येनी राम राम केला न् खळ्यांतनं पाय काढला."

शिवा जरा थांबला आणि त्यानें भीत भीत खानबहादुरांकडे बघितलें. ते चिरूटची राख झाडीत झाडीत शिवाच्या निवेदनाकडे लक्ष देऊन ऐकत होते. त्यांनीं शिवा थांबला आहे असं बघतांच स्मितपूर्वक त्याला उत्तेजन दिलं आणि शिवानें उरलेली हकीगत सांगितली.

"त्यो दिस मला काय माइत बगा कीं ह्यो आपला सायब नाइ अन् जर्मनीचा हाय म्हून. नाइ तर त्येला जाऊं दिला असता व्हय! नांव कशाला! पर् दुसऱ्या दिस गांवच्या शाळांत सोनू मास्तर न्हवतं कां त्यांच्याशीं गांठ पडली तवा त्ये म्हन्त्याती

कसं कीं म्यां त्या सायबाला धरायला पाइजे व्हतं. म्यां म्हटलं मास्तर, मला काय ठावं? गरीब इचारा म्हटलं रस्ता चुकूनशान् आलेला सांजचा, खाईल संत्रं अन् जायचं तर जाई न कां आपल्या टान्याला! अन् नाइ तरी आपलं सायबाला अपून कशापाइ वाइच धरनार कां इजा करनार? त्येनी काय हात उगारला कां शिइगाळी केली कां वाइच त्येला तरास देयाचा व्हय? पन् मास्तर म्हणल्याती की त्यो सायब जर्मनी आपल्याशीं लढते ना त्येचा शिपाई. अन् त्यो वो पळसखेड्यांत कसा आला तर सांगत्याती तुरुंगांतनं पळूनशान्! ह्यो कोनाच्या मुलकाला ठावं!! आतां काय चूक जाली असल सायब, तर माफी करा; पन् शिवानं काइ भिऊन बिऊन त्येला सोडून दिलं नाय. अन् साक्ष पाइजे असल तर खळ्यांतला गडी हाय आमचा."

शिवानें आपली हकीगत संपविली. खानबहादुरांनीं त्याचा गोषवारा नीट टिपून घेतला. नंतर ते शिवाला म्हणाले—

"अच्छा, और उसके बाद फीर तुमने उसको देखा नहीं?"

"नाइ साब. पन् सकाळीं शेतावर गेलों तवा तिकडून येणाऱ्या इसमानं सांगितलं कीं रात्रीं कोनी गोरा सायब रस्त्याला लिंबाच्या झाडाखालीं झोंपला व्हता. पर मी तथं ग्येलों तवा कुनी बी न्हवतं."

"बहोत अच्छा, शिवा. तुम् उन् लोगोंको डरनेवाले नहीं इसमें हमको बिलकुल शक्स नहीं. और अभी वक्त आया तो मैं कुच एक दो बाते तुमको बतलाना चहाता हूं. तुमारे सरीके मर्द

जब हम देखते तों हमारा ये ख्याल हमेश होता है के अपना देश हिम्मतवान् इनसानोंमें और कोइ देससेभी कमती नहीं. लेकिन् तुम् लढाईपर क्यौं नहीं जाते? तुमको तो मालूमही होंगा क्या बहादुरीसे अपने हिंदोस्थानके सिपाही लोक खास खास अंग्रेजोंके साथ खांदा भिडाकर आफ्रिकामें दुष्मन्से मुकाबला कर रहे है. हमारा एक छोकराभी वहांपर है और हिंदोस्थानीयोंकी मर्दुमकी देखकर दुष्मन्भी कैसी वाहावा करते रहते है इसका कुच थोडासा मतलब वो खतोंमें लिखता था. वो पढके हमने सोचा के जो तुमारे सरीके जवान अदमी और भी ये जंगमें हिस्सा लेवें तों अपनी इनसानकी इज्जतको बेशक्स बढाएं और हिंदोस्थानका नाम सब दुनियामें हो जाए के येभी एक शूर मर्दोंका मुल्क है. तुमारा इरादा नही होगा तो मै कुच तुमारे उपर जुलूम तों हरगीज नहीं कर सकता. लेकिन तुम् भी ये तो नही भूल सकते के अपना प्रांत शिवाजीके मराठा सिपाहीओंके अवलादोंका प्रांत है. और अव्वल हिंदोस्थानमें मराठा लोगोंकी ये ख्याती है के जैसे वे शांतीके दिनोंमें खेतपर नांगर चलवानें में चलाख है, वैसेही जंगके दिनोंमें लढाईके मैदानपर समशेर और बंदुक चलानेंमें बहादुर है."

खानबहादुरांचीं वाक्यें क्षात्रतेजाच्या प्रामाणिक स्फूर्तीनें बाहेर पडत असल्यामुळें त्यांचा परिणाम शिवावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. विशेषतः स्वतःच्या लढाईवर गेलेल्या मुलाच्या आठवणीनें त्या वाक्यांत उत्पन्न झालेली जिवंत श्रद्धा त्यांच्या परिणामकारकतेंत अधिकच भर घालीत होती. चिरूटची राख झाडून पुन्हां एक झुरका घेऊन खानबहादुरांनीं परत बोलायला सुरवात केली.

" जरा माबापको और बिबीको छोडके जाना लगेंगा. लेकिन् उसमें क्या बडी बात है? सरकार तुमको अच्छा तनखा देगा और बिबीकोभी. और जंग क्या सब् जनमभर चलनेवाला थोडाही है? हिम्मतसे लढेगे तो कोन कैह सकता तुमको क्या बढती मिलेगी? जब हमारा लडका गया तब उसके मा को और बिबीको और हमको भी दुःख तो जरूर हुवा; लेकिन हमने ये सोचा के वैसे जानेमेंही उसकी मर्दकी निशानी है. और आज उसको एक मेडल भी मिला है. और मौत भी आएगी तो मर्दकी, लढवय्येकी आएगी!"

शिवा हें सर्व ऐकत असतां त्याच्या मनांत अनेक विचारांचा गोंधळ माजत होता. पण खानबहादुरांच्या शांत, धिम्मेपणानें बोललेल्या वाक्यांनीं त्याच्या मराठा रक्तांत थोडी खळबळ उडविली होती यांत शंका नाहीं. अर्थात् त्या खळबळीची प्रेरणा अजून असावी तितकी जोरदार नव्हती, कारण लढाईवर जाण्याची कल्पना त्याला यावेळीं प्रथमच प्रत्यक्ष सुचविली गेली होती. त्यानंतर आणखी कांहीं संवादानंतर त्यानें खानबहादुरांना रामराम केला व तो तंबूतून बाहेर पडला.

जिल्ह्याच्या डी. एस् पी. शीं संभाषण करण्याचा मान मिळालेल्या शेतकऱ्यालाही शेतावरचं किंवा मळ्यांतलं नित्याचं काम चुकत नाहीं! शिवा तेथून बाहेर पडला तो मळ्याच्या रस्त्याला लागला. एकीकडे मातापितरांच्या आणि बायकोच्या प्रेमाची ओढ तर दुसरीकडे शौर्य गाजवून मिळविलेल्या कीर्तीच्या कल्पनारम्य मनोरथाचं वैभव अशा विचारांत शिवा आपल्या मळ्यांत पोहोंचला.

तेथें पोहोंचल्यावर मात्र नेहमींचं वातावरण आणि दैनंदिन कार्य-क्रमाचीं व त्या कार्यक्रमांतील उपकरणांचीं दृश्यें पाहतांच इतर विचारांचा त्याला विसर पडला व तो आपल्या कामाला संवयींच्या उत्साहानें लागला. मात्र काम करतांना आपल्या दंडांच्या पीळदार स्नायूंकडे आणि भरलेल्या दमदार छातीकडे तो एका भवितव्याच्या संदिग्ध, स्वतःला कदाचित् जाणीवही नसलेल्या सुप्त कल्पनेंत, अभिमानानें मधून मधून बघत होता.

संध्याकाळीं शिवा घरीं परत आल्यावर घरांतल्या सगळ्या मंडळींचीं जेवणं वगैरे संपून तीं पुढल्या पडवींत मिणमिण दिव्याच्या प्रकाशांत गप्पा मारीत बसलीं होतीं. तेव्हां शिवानें खानबहादुरांच्या आपल्याशीं झालेल्या भाषणाची हकीगत कोंडीबाला सांगितली. सैन्यांत पगार काय मिळेल, रजा वगैरे किती मिळते, इतर सवलती काय असतात, खानबहादुर आपली शिफारस करायला तयार आहेत वगैरे सर्व तपशीलांची माहिती त्यानें जमलेल्या कुटुंबांतील मंडळीला दिली. कोंडीबाचं घराणं रणांगणावरील कीर्तीला अगदींच पारखं नव्हतं. त्या घराण्यांतला एक पुरुष तानाजी मालु-सऱ्याच्या हाताखालीं लढला होता. त्यावेळची एक जुनी तरवार कोंडीबाच्या वाडवडिलांनीं घराण्याची एक अत्यंत बहुमोल ठेव म्हणून वर्षानुवर्षे जतन करून ठेवली होती. आणि दर दसऱ्याच्या दिवशीं तिची पूजा करण्याची त्या घराण्यांत चाल होती. शिवाच्या हकिगतीवरून घराण्याच्या परंपरेला साजेल अशाच एका कल्पनेचा आपण विचार करीत आहों हीच त्या कुटुंबांतील सर्वांची भावना होती. पण अर्थात्‌च शिवानें सैन्यांत जावं असं एकदम कुणालाच

वाटणं शक्य नव्हतं. तेव्हां प्रत्येकजण आडकाठीच्या दृष्टीनें नव्हे तर एकंदर सारासार, सांगोपांग विचाराच्या दृष्टीनें एक एक प्रश्न विचारूं लागला.

" ह्यो बग शिवा, तूं गेला मंजे मी मळा इकून टाकीन. मला म्हाताऱ्याला समदं जमायचं नाहीं," कोंडीबा म्हणाला.

" कशापायीं दादा, योक चांगला गडी आनखी पाहूनशान् ठेवला मंजे माजं समदं काम त्यो करील."

" अन् तुला कुठं कुठं जावं लागेल, बाबा?" शिवाच्या आईनें प्रश्न केला.

" त्यें काय सांगावं? खानबहादुरांचा मुलगा हाय ना त्याला पार समिंदरापार आफ्रिकेंत कां कुठंसं धाडलंय."

" अन् तुमी यकदां गेले म्हनजे किती वरस नाइ यायचे?" सारजानें प्रश्न केला.

" त्ये लढाई परमानं. पन् रजा मिळते म्हनूतात मंधी."

याप्रमाणें त्या कौटुंबिक चर्चेंत प्रत्येकानें आपआपल्या परीनें भाग घेतला. पण त्या चर्चेंत फारसं गांभीर्य नव्हतं. कारण शिवाचं सर्व भाषण कांहीं निश्चयाच्या स्वरूपाचं नव्हतं. शेवटीं, शिवाची आई म्हणाली—

" तुला जायचं असल तर जा बा, पन् सारजेची परमानगी घेऊनशान् अं."

" आमास्नी भेटाया या कवा कवा मंजे झालं. अन् लढाई संपल्यावर बिगि बिगि या."

बाहेर पावसाची सर येत होती. आकाश ढगांनीं काळंकुट्ट झालं होतं. मेघराजांची पिकांवर या हंगामांत कितपत कृपादृष्टी होईल याचा अंदाज पळसखेड्याचे शेतकरी आपआपल्या स्वभावा-प्रमाणें करीत होते. इतक्यांत मेघांच्या कडकडाटांतून वीज चमकली आणि तिच्या निमिषमात्र दिपविणाऱ्या प्रकाशांत बलभीम आखाड्यांतली तांबडी माती ओलीचिंब झालेली दिसली!

—*—

# ८. सैन्यांत दाखल

" कोन र, शिवा कां ? "

" कोन म्हादबा व्हय ? राम राम, म्हादबा. मीच कोंडीबाचा शिवा नवं कां. "

" कुठं बाजाराला चाललास व्हय ? "

" हां. "

" जरा आमच्या तानीस्नी भेटून यशील कां ? तिच्या मायनं ह्ये गठुडं दिलंय यवढं पोहोंचतं करायचं हाय."

" टाका कीं गठुडं जरा गाडींत. तानी व्हती त्याच घरांत हाय ना ? तुमी बी यायचं असेल तर चला कीं. "

" नाइ रे बा. म्हाताऱ्यास्नी कशापाइ वाइच खटपट. त्यवढं गठुडं दे अन् तानीस्नी अन् तिच्या दादल्यास्नी पुसलं म्हून सांग. "

जिल्ह्याच्या गांवीं शिवा आठवड्याच्या बाजाराकरितां गाडी घेऊन चालला होता. त्याला पळसखेड्याच्या वेशीपाशीं म्हादबा म्हाताऱ्यानें दुरून बघितलं आणि जवळ येऊन आपल्या मुलीचा वरीलप्रमाणें समाचार घेऊन यायला सांगितलं.

जिल्ह्याच्या ठिकाणीं पोहोंचल्यावर शिवानें आपली गाडी गणपत वाण्याच्या दुकानावर सोडली आणि प्रथम बाजारांतली

आपलीं कामं करून आणि विकत घ्यायचा माल विकत घेऊन तो परत त्या दुकानीं आला. गणपत वाण्याशीं इकडच्या तिकडच्या गप्पा मारायला त्याला थोडी सवड होती. त्या गप्पांत बाजारांतील वाढणारे भाव, उधारीला दुकानदारांची वाढती नाखुषी, पैशांची जरूरी वगैरे गोष्टींपासून तों यंदाच्या पावसाळ्याचा अंदाज व हंगामाची अपेक्षा, गणपत वाण्याच्या मुलाचं लग्न, प्रो. भगवंतरावांची त्या गांवीं उतरलेली सर्कस या विषयापर्यंत सर्वांचा अंतर्भाव झाला होता. त्यानंतर शिवानें गाडींतलं म्हादबा म्हाताऱ्यानें दिलेलं गाठोडं घेतलं व तो म्हादबाच्या तानीच्या घरीं गेला.

"या शिवाभाऊ, कुनीकडं आल्याती?"

"वांइच बाजाराला. म्हादबानं यवढं गठुडं दिलंय त्ये तुमास्नी द्याया."

"बसा कीं जरा. आमचीं मानसं गेल्याती बाहर. काइ च्या पानी?"

शिवानें चहापाण्याशिवायच तानीच्या आदरसत्काराचा स्वीकार केला.

"अन् म्हादबांची काळी गाय व्याली कां?"

"व्हय. गोऱ्हा झाला म्हून म्हनल्याती."

"अन् शेवंतीचं लगीन आवंदा करायचा इच्यार हाय कां?"

"बगत्याती दादा. पन् अजून नाइ जमलं."

"आमच्या बी सगुणेचं नाय जमत अजून, लइ खटपट केलीन् आमच्या मानसांनीं पर पैसा नडतोय जवा तवा!"

याप्रमाणें तानीच्या घरीं शिवाचा दुसरा एक गप्पांचा हप्ता झाला. तोंपर्यंत दुपारचे साधारण तीन चार वाजले असतील. शिवा परत गणपत वाण्याच्या दुकानाच्या जवळ येत होता. तो येत असतांना बाजारांतल्या एका मोठ्या पटांगणांत त्याला लोकांचा भला मोठा जमाव दिसला. काय गडबड आहे हें पहाण्याच्या इच्छेनें तो साहजिकच तिकडे गेला. जवळ जातांच त्याच्या कानांवर एका आवेशपूर्ण व्याख्यात्याचे शब्द पडूं लागले.

भाई कुमारांचं व्याख्यान होतं तें. शक्य त्या व्यासपीठा-वरून 'लाल समाजा'च्या धोरणाचा प्रचार करावयाचा या निश्चयाला अनुसरून भाई कुमारांनीं काढलेल्या दौऱ्यामधला तो एक टप्पा होता. भाई कुमारांना वक्तृत्वाची ईश्वरी देणगीच होती आणि त्यांचं वक्तृत्वही बहुरूपी होतं. शेलक्या सुशिक्षित समाजा-पुढें व्याख्यान देतांना सुललित आणि प्रौढ संस्कृतप्रचुर वाक्यांच्या सहा पौंडर्स तोफांची ते सरबत्ती करीत तर बहुजनसमाजापुढें साधे शब्द आणि लहान वाक्यें यांच्या सर्रास गोळीबारानें ते आपलें कार्य साधीत. त्यामुळें त्यांचं सव्यसाची वक्तृत्व सर्व ठिकाणीं सारखंच प्रभावी ठरे. आणि कां ठरूं नये ? बोलणाऱ्याच्या किंवा लिहिणाऱ्याच्या प्रामाणिकपणाचं आणि ऐकणाऱ्याच्या मनावरील परिणामाचं प्रमाण व्यक्तीव्यक्तीच्या बाबतींतही नेहमीं समच असतं असं नाहीं. मग ऐकणारी जेव्हां एक व्यक्ति नसून बहूजनसमाज असतो तेव्हां तें समच असावें असं कोण म्हणूं शकेल ? शिवाय जोंपर्यंत चलनी शब्द हे वस्तुतः सत्य गोष्टींचा अर्थ ध्वनित करीत

असतात तोंपर्यंत ते शब्द योजणाऱ्याच्या मानसिक वृत्तीचा विचार करण्याची काय जरूर ? आणि आपण प्रामाणिक आहोंत कीं नाहीं हें भाई कुमारांनाच काय पण दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीला हमखास-पणें सांगतां येईल अशी खात्री थोडीच आहे ? हेंच पहा ना आतां शिवाच्या कानीं भाई कुमारांचे शब्द पडत आहेत:—

"...पण आज तें स्वरूप बदललं आहे. हिटलरनें रशियाशीं मत्रीचा करार केलेला होता. कांहींएक कारण नसतां त्यानें तो करार फाडून टाकला. अचानक कुणाला कल्पनाही नसतांना त्यानें एकदम रशियावर स्वारी केली. तुमच्यामाझ्यासारख्या काबाडकष्ट करणाऱ्या कामगारांवर त्यानें शस्त्र उपसलं आहे. रशियाचे शूर शिपाई लढत आहेत. पण त्यांना आपण सर्वांनीं मदत केली पाहिजे. आपल्यापासून रशिया लांब आहे हें खरं. पण रशियांत आपल्या-सारखेच सामान्य नागरिक आहेत. तेही शेतकरी, मजूर, कामगार असेच आहेत. आपल्याला जसा हिंदुस्थान प्रिय आहे तसाच त्यांना रशिया प्रिय आहे. म्हणूनच ते शौर्यानें लढत आहेत. म्हणूनच आपणही आपलं कर्तव्य बजावलं पाहिजे आणि त्यांना मदत केली पाहिजे. कारण तेही आपल्याप्रमाणेंच कामगार लोक आहेत. आणखीही एक कारण आहे. रशियांतले कामगार, मजूर, शेतकरी आपल्या मायभूमीकरतांच लढत नाहींत. सर्व जगाकरितां लढत आहेत. त्यांचा लढा तुमचा, माझा, सर्व जगाचा लढा आहे. त्यांचं यश म्हणजे आपलं यश. ते स्वतंत्र तर आपण स्वतंत्र. हिटलरचं सबंध सैन्य रशियांतल्या मजूर, शेतकरी लोकांच्या सैन्यानें अंगावर घेतलं आहे. त्यामुळें

जगांतील सर्व शेतकरी—मजूरांत क्रांति झाली आहे. आज हें युद्ध तुमच्या माझ्यासारख्या सामान्य नागरिकांचं युद्ध झालं आहे. आजच्या परिस्थितींत आपल्यापैकीं कुणालाही स्वस्थ बसून भागणार नाहीं. शक्य त्या मार्गानें आपल्याला या युद्धांत मदत करायल' घावंलं पाहिजे. आपल्या सरकारनें लोकांनीं युद्धांत मदत करावी म्हणून सोयी केल्या आहेत. त्या सर्व सोयींचा आपण आजपासून फायदा घेतला पाहिजे. कारण त्यावर रशियाचा विजय अवलंबून आहे. रशियाचा विजय म्हणजे दोस्त राष्ट्रांचा, ब्रिटनचा विजय. रशियाचा विजय म्हणजे जगाचा विजय. रशियाचा विजय म्हणजे शेतकरी मजूरांचा विजय. म्हणजेच तुमचा माझा विजय. ( टाळ्यांचा गजर. ) पण ह्या विजयाच्या तयारीला आपण आजपासून लागलं पाहिजे. वेळ दवडतां उपयोगी नाहीं. आपल्यांतले जे कोणी सशक्त असतील, तरुण असतील त्यांनीं सैन्यांत दाखल झालं पाहिजे. आपला प्रांत हा मराठ्यांचा प्रांत आहे. मराठ्यांची कीर्ति विसरूं नका. (टाळयांचा गजर) सैन्यांत गेल्यावर तुम्हांला काय काय सवलती मिळतील त्या मी इथें सांगून तुमचा वेळ घेत नाहीं. पण आज रशियाची हांक ही महत्त्वाची गोष्ट आहे. त्या हांकेला उत्तर देण्याचा प्रश्न आहे. सैन्यांतल्या सवलतींचा नाहीं. या युद्धाच्या बाबतींत आपण जी मदत करूं तिच्याकडे सर्व जग डोळे लावून पाहात आहे. रशियांतील शेतकरी मजूर तुमच्याकडे विश्वासानें बघत आहेत. आपलं रक्त सांडतांना त्यांना त्या विश्वासाचा आधार वाटतो. बंधूंनो! रशियाच्या रक्ताच्या या प्रचंड अभिषेकांत हिंदुस्थानचे लढवय्ये लोक सामील होणार नाहींत कां ?"...

याप्रमाणें भाई कुमारांचं आवेशयुक्त भाषण होत होतं. तें संपल्यावर टाळ्यांच्या गडगडाटांत भाई कुमारांच्या गळ्यांत लोकांनीं फुलांचा हार घातला. आणि दिवस मावळायला लागण्यापूर्वी गाडी जुंपायला पाहिजे म्हणून शिवा परतला.

गणपत वाण्याच्या दुकानाजवळ सोडलेली गाडी जुंपून शिवानें पळसखेड्याची वाट धरली. गांवांतून बाहेर पडेपर्यंत त्याचं बैल हांकण्याकडे लक्ष होतं, कारण जिल्ह्याच्या गांवाच्या रस्त्यांतून गाडी न्यायची ती जरा काळजीपूर्वकच नेली पाहिजे. नाहींतर मोटारी, तांगे व पायीं चालणाऱ्या लोकांच्या गर्दीत भलताच प्रसंग ओढ-वायचा. पण गांव सोडून पळसखेड्याच्या रस्त्याला गाडी लागली तसें शिवानें बैलांचे दोर ढिले सोडले आणि त्यांना आपल्या लहरीच्या गतीनें चालायला मोकळीक दिली. ओळखीच्या रस्त्यानें बैल मंद गतीनें गाडी ओढीत होते. आजूबाजूला पावसाच्या सरींनीं भिजलेली जमीन आणि हिरवळलेलीं कुरणं व पालवलेली झाडीं एकामागून एक पाठीमागें पडत होतीं. बाजार करून आपआपल्या खेडेगांवांला जाणारे शेतकरी पुरुष व स्त्रिया पायरस्त्यावरून एकेकटे किंवा संगतीनें परत चालले होते. पश्चिमेच्या आकाशांत संध्या-काळचे मनोहर रंग न कळत बदलत होते, आणि रात्रीच्या आगामी काळोखाच्या अस्पष्टपणें जमणाऱ्या छायेंत आपल्या वैभवाचं प्रदर्शन भरवून जात होते.

सभोंवतालच्या प्रशांत आणि सहजगंभीर वातावरणांतून धिमेपणानें जाणाऱ्या गाडींत शिवाचं मन मात्र विचारांच्या काहूरांत

मग्न होतं. पळसखेड्याची कुणी एकादी व्यक्ति दिसली म्हणजे तिला गाडींत बसवून घेण्यापलीकडे त्याला आजूबाजूच्या जगाचं भान नव्हतं. हळू हळू त्या काहुरांतून एक निश्चय उदयाला येऊं लागला. खानबहादूर महंमद हुसेनांच्या भाषणानें तयार केलेल्या मनोभूमीवर भाई कुमारांच्या आवेशपूर्ण वक्तृत्वानें उगविलेला अंकुर होता तो. मराठा रक्ताची उमेद, रणांगणावर पराक्रम दाखवून नांव मिळविण्याची इच्छा, सारजाच्या प्रेमाला वीरश्रीचं लेणं चढविण्याची रम्य महत्त्वाकांक्षा आणि प्रत्यक्ष नाण्यांत मिळणाऱ्या दरमहाच्या पगारांतून सध्यांच्या परिस्थितींत म्हाताऱ्या कोंडीबाला करायच्या मदतीची पितृभक्तीची अपेक्षा इत्यादि अनेक जाणत्या अजाणत्या भावनांचा आणि विचारांचा तो निश्चय म्हणजे परिपाक होता.

घरीं आल्यावर शिवानें कुटुंबांतील मंडळींना आपला निश्चय सांगितला. पूर्वीच्या एका कौटुंबिक बैठकींत ज्या गोष्टीची केवळ एक विचारार्ह कल्पना म्हणून चर्चा झाली होती, त्याच गोष्टीचा आज एक निश्चित उद्देश म्हणून उहापोह झाला. कोंडीबा आणि बजाबा यांच्या कुटुंबांच्या संयुक्त बैठकींतून त्या उद्देशाची सर्व दृष्टींनीं छाननी झाली; आणि शिवाच्या निश्चयाला अनुमोदन मिळून तो गेल्यावर काय काय व्यवस्था करावयाची त्याचीही सामान्यतः रूपरेषा आंखली गेली. दुसऱ्या दिवशीं शिवा जिल्ह्याच्या गांवीं सैन्यभरती करणाऱ्या अधिकाऱ्यासमोर हजर झाला. अधिकाऱ्यानें त्याचं नांव, वडिलांचं नांव, राहण्याचं गांव वगैरे आवश्यक माहिती लिहून घेतली. शिवाची शारीरिक तपासणी झाली आणि तो सैन्यांत दाखल व्हायला लायक ठरला.

ज्या दिवशीं शिवा सैन्यांत दाखल व्हायला निघणार होता त्या दिवशीं कोंडीबाच्या आणि बजाबाच्या घरांत उदास विरहाकुलता आणि गडबड यांचं वातावरण पसरलं होतं. मराठ्यांच्या नांवाला साजेल अशाच कामगिरीवर शिवा जात असल्यानें दोनही कुटुंबांत अभिमान तर वाटत होताच; पण प्रेमाच्या माणसांना होणारी ताटातूट भासल्याशिवाय आणि विषण्ण केल्याशिवाय कशी रहाणार! शिवाच्या आईनें आणि सारजानें आपल्या हातांनीं आजच्या दिवसाकरितां जें जेवण तयार केलं होतं त्यांत शिवाला आवडणाऱ्या पदार्थांचा सहाजिकच विशेष भरणा होता. वाडवडिलांपासून आलेली जुनी तरवार आज दसरा नसतांनाही तळघरांतून वर आणली गेली होती आणि शिवानें तिची पूजा मनोभावानें केली होती.

शेवटीं, शिवा घरांतून बाहेर पडण्याचा क्षण आला. कौटुंबिक निरोपाचा तो प्रसंग अत्यंत हृदयद्रावक होता. देवांच्या खोलींत कोंडीबा, शिवाची आई, सारजा आणि शिवा एवढीच मंडळी होती. त्या क्षणांत शब्दाला किंमत नव्हती. हृदयांतल्या भावना व्यक्त करायला सामान्य शब्दांचे सांचे मोडून त्यांचा रस ओतून कुठली तरी अलौकिक भाषा निर्माण होणं जरूर होतं. खेडेगांवांतल्या अशिक्षित कुटुंबांत तें सामर्थ्य कुठून असणार!

शिवानें वाडवडिलांच्या तलवारीला मस्तक लावून नमस्कार केला.

नंतर त्यानें कोंडीबाच्या पायांवर डोकं ठेवलं. शांतपणें, संथपणें डोळयांतून टपटपणाऱ्या संतत अश्रूंना खांद्यावरच्या धोतरानें पुसून, एक शब्दही न उच्चारतां, संयमित आणि म्हणूनच

पराकाष्ठेच्या आर्त कारुण्यानें म्हाताऱ्या कोंडीबांनीं फक्त शिवाच्या शिराला आशीर्वादाचा हस्तस्पर्श केला.

शिवानें आपल्या आईच्या पायांवर डोकं ठेवलं. त्या माउलीनें घळघळणाऱ्या अश्रूंनीं शिवाला पोटाशीं धरलं आणि अश्रूंनीं अडखळणाऱ्या शब्दांत आशीर्वाद दिला—

" भवानीमाय माज्या शिवाची पाठीराखी हाय. "

शिवानें सारजाकडे प्रेमार्द्र डोळ्यांनीं बघितलं. खांद्यावरच्या पदराचं एक टोक तोंडांत दाबून सारजानें एक मोठा हुंदका दिला आणि रडव्या आवाजांत म्हटलं—

" चिठी धाडाया इसरूं नका बर् कां. आमी समदी राय देखूं. "

या जगांत कोण कुणाला आशीर्वाद देणार !

आणि कोण कुणाची वाट पाहाणार !!

—पण रणांगणावर निघालेल्या वीरपुत्राला वीरमाता आणि वीरपिता यांनीं दुःखानें पण अभिमानानें दिलेल्या आशीर्वादाचं कवच असतं.

आणि रणांगणावर निघालेल्या वीरपतीला वीरपत्नीनें दुःखानें पण अभिमानानें दिलेल्या निरोपाचं प्रोत्साहन असतं.

रणांगणाचीं स्वरूपं आणि स्थानं बदलतात. कुठें पंचमहाभूतांशीं दुर्दम्य झगडा असतो तर कुठें यंत्रसज्ज शत्रूंशीं सामना असतो. कुठें शस्त्रास्त्रांच्या खणखणाटांत बेहद्द झुंज असते तर कुठें मानसिक शक्तींचा निःशब्द संग्राम असतो. पण रणांगणाचं स्वरूप आणि स्थान कसंही असलं तरी मराठ्यांच्या इतिहासांतील आशीर्वादांची आणि निरोपांची ही उज्ज्वल परंपरा मात्र अखंड आहे!

# १. दोन गुपितें

सेकंड क्लासचा प्रवास झाला तरी मनुष्याला शीण आल्याशिवाय थोडाच राहतो! आणि भाई कुमारांना तर लखनौहून परत येतांना दिल्लीला जावं लागलं होतं. रात्रीचा प्रवास असला तरी वास्तविक त्यांना तसा त्रास फारसा झाला नव्हता. गाडींतल्या डब्यांत बरोबर प्रवास करणाऱ्या एका इंग्रजानें तात्पुरत्या झालेल्या मैत्रीच्या आदरानें त्यांना थोडी व्हिस्की आणि सोडा दिला होता. त्यामुळें प्रवासांतला कंटाळा बराच दूर झाला होता. एरव्हीं सहसा भाई कुमार मद्याला हात लावीत नसत. पण प्रवासांतल्या मैत्रीला जर त्यानें ओलावा येणार असेल तर तें नाकारण्याइतके भाई कुमार कर्मठही नव्हते. तरी पण लखनौच्या मुक्कामांत त्यांच्यावर बराच ताण पडला होता. आपल्या पक्षाच्या कार्यकारी मंडळाच्या या विशेष बैठकीला हजर राहणं त्यांना टाळणं शक्य नव्हतं. कारण त्यांत युद्धविषयक एक महत्त्वाचा ठराव चर्चिला जाणार होता. वस्तुतः तो ठराव इतका समंजसपणाचा होता कीं त्यावर निष्कारण चर्चा करण्याची कुणाला आवश्यकता वाटेल अशी भाई कुमारांना स्वप्नांतही कल्पना आली नसती! पण अखंड वादविवाद हा तर कम्युनिस्टांचा प्रकृतिधर्म! त्यांत भाई चरणसिंग, भाई खान, भाई विनयप्रसाद म्हणजे कडवे कम्युनिस्ट! परिस्थितीच्या अनुरोधानें

राजकीय धोरण कसं आंखायचं याची त्यांना मुळींच कल्पना नव्हती. साम्राज्यशाही आणि भांडवलशाही यांच्या जुन्याच कल्पना डोक्याशीं धरून वाटेल तसले प्रश्न विचारतांना हिटलरनें रशियावर केलेल्या स्वारीनें ह्या युद्धाचा आतां त्या कल्पनांशीं कांहीं संबंध उरलेला नाहीं ही साधी प्रकाशाइतकी स्वच्छ गोष्ट, पण तिचाही त्यांच्या डोक्यांत प्रकाश पडेना ! युरोपांतले इतर एकेक लहानमोठे देश हिटलर पायांखालीं तुडवीत असतांना त्याही देशांत मजूर, कामगार, शेतकरी होतेच ना? मग त्यावेळीं आपण ह्या युद्धांत प्रत्यक्ष भाग घ्यायला अहमहमिकेनें तुटून न पडतां साम्राज्यशाहीच्या बदलौकिकावर आणि भांडवलशाहीच्या स्वार्थसाधूपणावर तोंडसुख घेत आपल्या विरोधाची घोषणा कां केली? आणि हिटलरचे वैमानिक सतत बॉंबचा वर्षाव करीत असतांना धिम्या चिकाटीनें आपलीं घरंदारं उध्वस्त झालेलीं बघणारं ब्रिटनमधले लोकही शेतकरी, मजर, कामगारच नव्हते का ? मग तेव्हांच्या आपल्या युद्धविरोधी भूमिकेचा पुढें असलेल्या युद्धसहाय्यक ठरावाशीं कसा समन्वय करावयाचा? वगैरे लहान मुलालाही न शोभणाऱ्या विधानांनीं ते जुन्या ठोक्याचे मित्र भाई कुमाराशीं वाद घालीत बसले ! याचाच अर्थ म्हणजे त्यांनीं समाजसत्तावादाचं किंवा कम्यूनिझमचं अजून पूर्ण आकलन केलं नव्हतं याशिवाय दुसरा काय असणार ? शेवटीं, अर्थात्च भाई कुमारांचा विजय झाला. पण त्या सर्व घसाफोडीचा त्यांच्या शरीरावर आणि मनावर परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. आणि त्यामुळें रेल्वेचा प्रवास अर्थात् त्यांना थोडासा जाणवला.

भाई कुमार आले त्या दिवशीं "लाल समाजा"च्या कचेरींत गेले नाहीं. एक दिवस विश्रांति घेऊन दुसऱ्या दिवशीं गेले. तेव्हां त्यांचा भागीदार मित्र त्यांच्याशीं "लाल समाजा"च्या हिशेबाबद्दल बोलायला आला होता. दोघांच्याहीपुढें खर्चाचा आणि उत्पन्नाचा तक्ता होता. त्यांतील कागद, छपाई, कचेरींतल्या लोकांचे पगार वगैरेंचे आंकडे पाहून तो मित्र भाई कुमारांना म्हणाला—

"कुमार, हें बघ आपल्याला "लाल समाजा"तून कांहीं फायदा मिळवायचा नाहीं. गुंतवलेल्या रकमेवर दोन टक्के व्याज जरी सुटलं तरी पुरे आहे. पण तितकंही..."

"अरे थोडे दिवस असं चालायचंच. हें पहा तुरुंगांतून सुटून येऊन "लाल समाज" पुन्हां सुरू करून कांहीं फार दिवस झाले नाहींत. जरा जम एकदां बसला म्हणजे मग काळजी करावी लागणार नाहीं."

"तें खरं रे, पण जरा जमा आणि खर्च यांची तोंडमिळवणी तरी करायला नको का?"

"पण आतां कशी करणार?"

"पूर्ण तोंडमिळवणी झाली नाहीं तरी त्या दिशेनें प्रयत्न करणं जरूर आहे. जाहीरातींचं उत्पन्न वाढविण्याचं काम कुणीं तरी अंगावर घ्यायला हवं. पण त्यावर अवलंबून राहातां येत नाहीं. दुसरं म्हणजे मला वाटतं "लाल समाजा"चं एक पान कमी करावं; आणि तूं दरमहा पांचशें रुपायांऐवजीं तीनशें..."

इतक्यांत भाई कुमारांच्या टेबलावरच्या टेलिफोनची घंटा वाजली. त्यांनीं टेलिफोन कानांशीं लावला आणि ते बोलूं लागले—

"हॅलो, कुमार मी..."

"कोण?...ओ हो होय...नमस्कार! काय?..."

"हं ...समजलों ... कुठं म्हणालांत? ... असं होय ...? मला वाटलं इथंच..."

"पण काय एकंदर सामान्यतः काय काम ... ?"

"हो हो. कळलं कळलं... पण इतक्यांत उत्तर..."

"हं...त्यानंतर उत्तर होय?... बरं ...अर्थात् मला जरा विचार करावा लागेल..."

"अच्छा...नमस्कार...नमस्कार."

आणि भाई कुमारांनीं टेलिफोन खालीं ठेवला. त्यानंतर त्यांच्या भागीदारानें पुन्हां सुरवात केली—

"तेव्हां तात्पुरती गोष्ट म्हणूनच..."

पण भाई कुमारांचं त्या विषयावरचं लक्ष उडालेलं होतं. त्यांनीं गोड सामोपचारानें आपल्या भागीदाराचं समाधान केलं; आणि त्याला एकदां वाटेला लावल्यावर "लाल समाजा"चा अग्रलेख लिहावयास घेतला.

"तत्त्वप्रणालींचा संग्राम."

"कुठल्याही घटनेचें, मग ती युद्धकालांतील असो कीं शांततेच्या काळांतील असो, वैय्यक्तिक असो कीं सामाजिक असो, अंतिम अधिष्ठान एक..."

त्यानंतर कांहीं दिवसांनीं भाई कुमार एक दिवस "लाल समाजा"च्या कचेरींतील आपल्या खोलींत येऊन कोट काढून व

सदऱ्याच्या बाह्या वर करून आपल्या खुर्चीवर बसतात तोंच पुढल्या टेबलावर एक सरकारी पाकीट असलेलं त्यांना दिसलं. एका विशिष्ठ अपेक्षेनें त्यांनीं तें पाकीट उघडलं आणि आंतील मजकुरानें त्यांची अपेक्षा खरी ठरली. वर्तमानपत्रव्यवसायांत जबाबदारीचं संपादकीय काम केलेला, अनुभवी, कर्तबगार, हिंदुस्थानच्या राजकीय वातावरणाशीं आणि घडामोडींशीं त्याचप्रमाणें आंतरराष्ट्रीय राजकारणाशीं आणि बदलत्या घटनांशीं परिचित असलेला आणि हिंदुस्थानच्या जनतेच्या मनाचा अंदाज ज्याला करतां येईल अशा वर्तमानपत्रविशारदाची हिंदुस्थान सरकारला आपल्या प्रचारखात्यांत जरूरी होती. जागा जबाबदारीची असल्यानें आणि शक्य तितका लायक मनुष्य मिळावा म्हणून पगार दरमहा हजारपर्यंत देण्याची सरकारची तयारी होती; आणि त्या जागेवर हिंदी मनुष्य नेमावा अशी सरकारची विशेष इच्छा होती. तेव्हां त्यांनीं ती जागा भाई कुमारांना देऊं केली होती. कांहीं दिवसांपूर्वीं आलेल्या टेलिफोननंतर भाई कुमारांच्या मनांत जी एक विचारांची सांखळी सुरू झाली होती, पण जिला नंतर थोडासा खंड पडला होता ती सांखळी पुढें असलेल्या सरकारी पत्रांतील मजकूर वाचतांच पुन्हां जोरानें सुरू झाली. सकृद्दर्शनीं बघितलं तर भाई कुमारांना आपला मेंदू इतका शिणविण्याची खरोखर जरूरी नव्हती. पण कुठल्याही गोष्टीचा सांगोपांग विचार केल्याशिवाय तिच्या बाबतींत आपण काय करणं योग्य आहे हें ठरवायचं नाहीं हा भाई कुमारांचा मनोधर्मच होता. शिवाय भाई चरणसिंग वगैरे आपल्या सहकाऱ्यांची युद्धविषयक धोरणाबाबत जरी त्यांनीं पूर्ण खात्री पटवून दिली होती तरी त्या धोरणाची मर्यादा प्रस्तुत जागा स्वीकारण्यापर्यंत पोहोंचतेच

कीं नाहीं याबद्दल त्यांना पुसट का होईना पण शंका होती. संपूर्ण विचाराअंतीं भाई कुमारांनीं ही शंका अर्थात् निराधार आहे असं ठरविलं आणि समाजसत्तावादाच्या किंवा कम्युनिझमच्या केवळ तात्त्विक भूमिकेवरून स्वतःच्या आयुष्याच्या विरोधविकासांतील एक नैसर्गिक टप्पा आणि जागतिक जीवनांतील ऐतिहासिक अपरिहार्यतेचा एक अनिवार्य आविष्कार म्हणून त्या जागेचा स्वीकार केला.

वरील विचारांत व आपल्या पुढील कार्यक्रमाची रूपरेषा कर्तव्यबुद्धीनें आणि कल्पनाशक्तीच्या कुंचल्यानें आंखतांना भाई कुमारांचा बराच वेळ गेला. त्यामुळें नाइलाजानें त्या दिवसाचा " लाल समाजा"चा अग्रलेख लिहायला त्यांना जमलं नाहीं. तेव्हां स्वतःच्या अग्रलेखाऐवजीं त्यांनीं सुलभा लिखितेनीं लिहून दिलेल्या एका लेखाला अग्रलेखाचं स्थान दिलं.

संध्याकाळीं डॉ. प्रभुणेंच्या घरीं जेवण होतं. त्या ठिकाणीं भाई कुमार आणि सुलभा लिखिते यांची भेट झाली. भाई कुमारांच्या चेहेऱ्यावर दिसणाऱ्या आनंदानें डॉ. प्रभुणेंची पत्नी विमल हिचं लक्ष वेधलं. तिनें कुमारांना नमस्कार करून लखनौच्या दौऱ्यांतील कांहीं महत्त्वाच्या घटनांचा तो आनंद निदर्शक आहे का म्हणून विचारलं. त्यांच संभाषण चालू असतांच डॉप्रभुणे. त्यांत सामील झाले आणि शेवटीं एकदांची भाई कुमारांना जेवायला यायला फुरसत मिळाली याबद्दल त्यांनीं समाधान प्रगट केलं. हा वेळपर्यंत सुलभा लिखिते जेवायला आलेल्या इतर मंडळीशीं बोलण्यांत गुंतली होती. तिनें फक्त आपल्या मानेनें आणि डोळ्यांनीं भाई कुमारांना ओळख दिली होती. जेवण होत

असतांनाही भाई कुमारांना तिच्याशीं बोलण्याची संधि मिळाली नव्हती. पण जेवण आटोपल्यावर हात धुवून जेव्हां सर्व मंडळी पानसुपारी खाण्याकरितां दिवाणखान्यांत आली तेव्हां भाई कुमार सुलभेच्या जवळच्या खुर्चीवर येऊन बसले. इतर मंडळींनीं आपआपलीं वलयें बनविलीं असल्यानें कुमारांचा आणि सुलभेचा संवाद कुणाला मुद्दाम प्रयत्न केल्याशिवाय ऐकूं जाणं शक्य नव्हतं. भाई कुमारांनीं विजेच्या दिव्याच्या प्रकाशांत गौर रंग आणि कुरळे केंस खुलून दिसणाऱ्या सुलभेकडे पाहातांच त्यांना तिच्या सौंदर्याचा एका नव्या प्रकाशांत प्रत्यय आला; आणि ते गौरवाच्या शब्दांत उद्गारले—

"आज तुम्ही खरोखर किती सुंदर दिसताहांत या हिरव्या पातळांत!"

"हं ऽ", सुलभेनें त्यांच्या स्तुतीचा नेहमींच्या अल्लड आनंदानें पण अव्याजपणें स्मितपूर्वक स्वीकार केला; आणि तोंडांतल्या विड्याला पूरक म्हणून थोडं खोबरं खाल्लं व कुमारांना थोडं खोबरं देऊं केलं. आधींच आरक्त असलेले तिचे ओठ विड्यानें अधिकच शोभून दिसत होते.

"आज तुम्हांला दोन गुपितं सांगण्याची मी संधि पाहात होतों." सुलभेनें दिलेलं खोबरं घेत घेत भाई कुमार म्हणाले.

"खरंच! काय तीं?" सुलभेनें अधीर कुतूहलानें पृच्छा केली.

"तुम्ही परवां आणून दिलेला लेख मी उद्यांच्या 'लाल समाजांत' अग्रलेख म्हणून छापला आहे."

" खरंच ? " सुलभेच्या मुखावर आश्चर्य आणि अविश्वास त्याबरोबरच आशा आणि आनंद यांच्या मिश्रणानें मोहक प्रफुल्लता आली होती.

" खोटं वाटत असेल तर उद्यांचा अंक पहा. "

" आणि दुसरं गुपित ? " सुलभेनें अधिक अधीरतेनें प्रश्न केला.

" हां ऽ, तें इतक्यांत सांगायचं नाहीं ! "

" पण मी कुणाला कळूं देणार नाहीं. "

" तरी पण वेळ आली म्हणजे. "

" अच्छा. मग सांगायचं आहे म्हणून तरी कशाला सांगितलं. " सुलभेचा जरा विरस झाला.

सुलभेला तें गुपितही त्याच संध्याकाळीं कळलं, पण जरा उशीरां. जेवायला आलेली मंडळी आपआपल्या घरीं जावयाला निघाली. प्रथमतः सुलभेला डॉ. प्रभुणे आणि विमल आपल्या मोटारींतून घरीं पोहोंचवणार होते. पण भाई कुमारांनीं तिला आपल्या मोटारींतून सहज घरीं सोडतां येईल म्हणून ती जबाबदारी आपल्या अंगावर घेतली. सुलभेनें स्वभावसहज निरागसतेनें त्यांच्या मदतीचा साभार स्वीकार केला. आणि विमलनें सुलभेची काळजी घ्यायचं भाई कुमारांना बजावल्यावर त्यांची मोटार चालू झाली.

" आतां तरी सांगाल काय गुपित आहे तें ? " सुलभेनें प्रश्न केला.

" होय. पण या कानचं त्या कानाला कळूं द्यायचं नाहीं सध्यां. "

" कबूल. "

" सरकारच्या प्रचारखात्यांत एक मोठी हुद्याची जागा देऊं केली आहे मला त्यांनीं. "

" कुठें ? "

" दिल्लीला." मोटारीनें वळसा घेत भाई कुमारांनीं उत्तर दिलं.

" तुम्ही घेणार आहांत ती जागा ? "

" नक्की नाहीं; पण बहुतेक. "

" जरूर घ्या. " सुलभेनें प्रोत्साहनाच्या स्वरांत म्हटलं.

त्या रात्रीं सुलभेला घरीं पोहोंचायला अर्धा पाऊण तास उशीर झाला.

आणि पंधरा दिवसांनीं भाई कुमार दिल्लीला गेले.

—*—

# १०. सुटका

सुलभेनें सर्सर् आपली पांच वारी साडी ओढून फेडली आणि पलंगावर फेकून दिली. तिच्या नेहमींच्या विलोभनीय पण ऋजु चेहऱ्यावर संताप आणि चीड ओसंडत होती. तिच्या हंसऱ्या डोळयांत करारी निर्भर्त्सना भरली होती. सूडाच्या भावनेइतकी त्याज्य भावना तिनें कधींही अनुभविली नव्हती आणि याही क्षणाला त्या भावनेची तिला पुसटसुद्धां कल्पना नव्हती. तिला कुणी विचारलं असतं तर ज्या घटनेनें तिच्यांत हें स्थित्यंतर घडून आलं होतं त्या घटनेच्या संदर्भांत सूडाची भावना केवळ अप्रस्तुत म्हणन तिनें उत्तर दिलं असतं. कारण तिच्या कमनीय पण निखालस निरागस अशा प्रफुल्ल खेळकरपणाचं आणि आकर्षक वागणुकीचं संगोपन ज्या प्रकारच्या माहेरच्या आणि सासरच्या वातावरणांत झालं होतं त्या वातावरणाच्या शिकवणूकीची मूलभूत घडणच अशी होती कीं प्राप्त परिस्थितींत तिला फक्त एकच भावना प्रस्तुत आणि यथार्थ वाटावी; आणि ती म्हणजे संतापपूर्ण, तुच्छतापूर्ण तिरस्काराची. ती भावना तिच्या रोमरंध्रांतून यावेळीं भरली होती. आणि त्या भावनेनें तिच्या मोहक मार्दवाचं रूपांतर अत्यंत प्रक्षुब्ध अशा सुंदर गौरवर्ण भिल्लीणींत केलं होतं.

बाहेरचे कपडे काढून सुलभेनें घरांत वापरायची पांढरी साडी परिधान केली. आणि ती आपल्या निजावयाच्या खोलींतील आराम खुर्चीवर बसली. बाहेर अंधार पडला होता. तिच्या खोलीच्या खिडकींतून आभ्राच्छादित आकाशांतला एकाद दुसरा तारा मधूनच दिसत होता. ए. आर्. पी.च्या नियमांनुसार काळी आच्छादणी लावलेल्या दिव्याच्या अर्धवर्तुलाकार छायेची कड तिच्या अंगावर पडली होती. त्यामुळें तिचें अर्धें शरीर पूर्ण प्रकाशांत आणि अर्धें अंधुक प्रकाशांत होतें. खुर्चीवर ती अगदीं निश्चल बसली होती.

पोटांत दोन महिन्यांचा अजाण गोळा बाळगून सुलभा अनाहूत मातृपदाचा स्वीकार करीत होती. भाई कुमारांच्या तर्कशास्त्रांत विरोधांतून उदयास येणाऱ्या विकासालाच फक्त स्थान होतं. प्रीतीच्या संगतींतून बहरणाऱ्या विकासाला त्यांत स्थान नव्हतं. आरामखुर्चीवर एकट्याच बसलेल्या सुलभेच्या मनश्चक्षूंसमोर गेल्या कांहीं महिन्यांतील नानाविध प्रसंग चलत्चित्रपटाच्या द्रुतगतीनें येऊन गेले. त्या अनेक प्रसंगांच्या कांहीं अंशीं अस्पष्ट झालेल्या रूपरेषांच्या संकलित पार्श्वभूमीवर दोन प्रसंग मात्र अगदीं स्पष्टपणें उठून दिसत होते. त्या प्रसंगांतील प्रत्येक हालचाल, प्रत्येक शब्द, प्रत्येक आविर्भाव, प्रत्येक दृष्टिक्षेप सुलभेच्या डोळ्यांसमोर साद्यंत, तपशीलवार उभा राहात होता. आणि त्या दोन प्रसंगांतील परस्परविरोध प्रत्येकाच्या स्मृतींत एक प्रकारचा विलक्षण जिवंतपणा उत्पन्न करीत होता.

त्यापैकीं पहिला प्रसंग भाई कुमारांनीं तिला अगदीं प्रथम वश केलं तेव्हांचा होता. अशीच संध्याकाळची वेळ होती. भाई

कुमार आणि सुलभा भाई कुमारांच्या दिवाणखान्यांत एकटेच होते. बाहेर पावसाची झड लागली होती. भाई कुमारांनीं तिच्या सौंदर्याच्या स्तुतीनें प्रच्छन्न प्रियाराधनेला सुरवात केली होती. तिची मोहकता आणि दिलखुलास वागणूक यांची प्रशंसा करीत आपल्याला तिच्या-बद्दल वाटणाऱ्या प्रेमाचं आणि आदराचं संमोहनजाल विणायला त्यांनीं सुरवात केली. प्रथमतः सुलभेला भाई कुमारांचं बोलणं म्हणजे मानवी पौरुषानें केलेला मानवी स्त्रीत्वाचा गौरव वाटला आणि तिनें आपल्या नैसर्गिक रम्य हास्यानें त्याचा स्वीकार केला. त्यामुळें धीट बनून भाई कुमारांनीं आपल्या हृदयांतील खऱ्या भावनेची हळू हळू परिस्फुटता केली. तिला बघितल्यापासून त्यांच्या मानसिक व्यापारांचा ती मध्यबिंदू झाली होती. त्यांनीं मनानें तिला आपलं हृदय अर्पण केलं होतं. मग त्यांनीं विवाहबद्ध कां होऊं नये? आणि आतां तर त्यांच्यापुढें मोठ्या पगाराची सरकारी नोकरी चालून आली होती. ती मिळाल्यावर सुलभेला सुखाच्या शिखरावर पोहोंचवायला त्यांना कितीसा वेळ लागणार? आणि त्यांना सुलभेविषयीं वाटणाऱ्या निस्सीम प्रेमाचं यापुढें तिच्या सुखाशिवाय दुसरं कोणचं ध्येय असणार? भाई कुमार जसजसे आपल्या हृदयांतील भावनेचं सुलभेसमोर अधिकाधिक वर्णन करायला लागले तसतसे ते त्या भावनेनें अधिकाधिक धुंद व्हायला लागले होते. जणूं काय त्या भावनेला तिचं वाक्स्वरूप हें इंधनच होतं. सुलभेला या प्रसंगाची अपेक्षा नव्हती. शेवटीं, सुलभेनें आपल्या पावित्र्याभोंवतीं उभ्या केलेल्या कायिक, वाचिक, मानसिक तटबंदीला

आपल्या मोहक याचनापूर्ण शब्दांच्या अखंड वर्षावानें एकही खिंडार पडत नाहीं असं जेव्हां भाई कुमारांनीं बघितलं तेव्हां स्वतःचं भान विसरून त्यांनीं तिला आपल्या पाशवी शक्तीनें वश केलं. पण त्यानंतर त्यांनीं तिचं सांत्वन करीत तिला धीर दिला होता कीं लवकरच्च आपण विवाहबद्ध होऊं. आपल्या स्त्रीत्वानें अबला बनलेल्या सुलभेनें स्वतःची लाज स्वतःजवळ राखली.

त्यानंतरचा दुसरा प्रसंग भाई कुमार आपल्या नव्या नोकरीवर रुजू व्हायला निघण्याच्या एक दोन दिवस अगोदरचा होता. तीही एक संध्याकाळच होती. पण बाहेर आकाश मात्र जरा निवळलं होतं. भाई कुमारांच्या पहिल्या प्रसंगांतील वर्तनाचा निश्चित नव्हे पण शक्य असा परिणाम सुलभेनें त्यांच्या निदर्शनास आणला होता. आणि भाई कुमार त्यावर तिला एक मोठं व्याख्यान देत होते. समाजसत्तावादावर अधिष्ठित असलेल्या सामाजिक रचनेंत स्त्री आणि पुरुष यांतील भेदाचं स्थान; स्त्रियांची उन्नति आणि त्यांचें आर्थिक स्वातंत्र्य व सामाजिक समता; विवाहसंस्थेची अनवश्यकताच नव्हे तर दुष्टता; वैषयिक वासनांच्या तृप्तीवर मातृपदाच्या किंवा पितृपदाच्या अप्रस्तुत जबाबदारींनीं युगानुयुगें लादलेलीं अप्रयोजक बंधनें आणि त्यामुळें होणारी सर्वांगीण मानवी प्रगतीची कुचंबणा; समाजांतल्या सर्व शिशुसंगोपनाची जबाबदारी सामाजिक म्हणून शिशुसंगोपनालयांची जागतिक क्रांतीच्या दृष्टीनें परम जरूरी; वगैरे समाजसत्तावादप्रणीत समाजसंस्थेचीं अनेक अंगें ठिकठिकाणीं उदाहरणें देऊन भाई कुमार आपल्या वक्तृत्वपूर्ण शब्दांत विशद करून सुलभेला सांगत होते. आणि शेवटीं भावनेच्या

भरांत दिलेलं विवाहवचन पाळण्याची आपली इच्छा असली तरी केवळ तात्त्विक भूमिकेवरून तिची अपरिहार्यता ऐतिहासिकच आहे अशी आपली प्रामाणिकपणें अजून खात्री झाली नाहीं असं त्यांना नाइलाजानें कबूल करावं लागलं. सुलभेला यापुढें अधिक व्याख्यान ऐकण्याची इच्छा नसल्यानें एक शब्दही न काढतां व भाई कुमारांच्याकडे ढुंकूनही न बघतां तिनें आपल्या घराचा मार्ग धरला.

हे दोनही प्रसंग अत्यंत उठावदार रंगांत सुलभेच्या डोळयांपुढें आज एकसमयावच्छेदेंकरून उभे राहात होते. आणि त्या डोळयांच्या दृश्य नजरेंतील कडवेपणा द्विगुणित करीत होते. एकंदर आपल्या परिस्थितीचा नीट अंदाज बांधल्यावर पुढें काय करावयाचें याबद्दल तिनें आपल्या मनाचा निश्चय केला. त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं जेवणं झाल्यावर ती आपल्या सासूसासऱ्यांच्या खोलीकडे गेली. आणि तिनें खोलीच्या दारावर टकूटक् करून म्हटलं—

"मी आहे सुलभा; आंत येऊं कां जरा?"

प्रो० लिखिते आणि त्यांची पत्नी दोन पलंगांच्यामध्यें दोन खुर्च्यांवर बसून सुपारी खात होते. प्रो० लिखित्यांनीं आंतून सुलभेला उत्तर दिलं—

"सुलभा, ये कीं आंत."

दार उघडून सुलभा आंत गेली आणि बाजूची खुर्ची ओढून आपल्या सासूसासऱ्यांच्या जवळ बसली. प्रो. लिखितेंच्या पत्नीनें तिच्याकडे बघून विचारलं—

" कां, बरं वाटत नाहीं का ? काय दुखतंय ? "

" नाहीं. कांहीं दुखत बिखत नाहीं. पण मला तुम्हांला कांहीं तरी सांगायचं आहे. " असं म्हणून शांतपणें, धिम्या आवाजांत, भावनोद्रेकाचं फाजील प्रदर्शन न करतां, एक प्रकारच्या करड्या पण विश्वासपूर्ण स्वरांत तिनें सुरवात केली :

" मला हें घर सोडायची इच्छा नव्हती. पण असं कांहीं होईल अशी कल्पनाही नव्हती. मी कुमारांच्याकडे जायलाच नको होतं पहिल्यांदा. तीच माझी मोठी चूक झाली. एक दिवस संध्याकाळीं त्यांनीं माझ्यावर जबरदस्ती केली. पण मग नंतर लगेच माझ्याशीं लग्न करायचं त्यांनीं कबूल केलं होतं. मला तुम्हांला सोडायची इच्छा नव्हती. तुम्ही दोघांनीं मला मुलाप्रमाणें वागवलं. माझं तुमच्यावर फार प्रेम आहे. मला सांगतां येत नाहीं मला तुमच्याबद्दल काय वाटतं तें. पण झालं तें असं झालं. निदान लोकापवादापासून तुमचं रक्षण होईल म्हणून लग्न आपद्धर्म वाटला त्या प्रसंगानंतर. पण आतां कुमार तयार झाले तरी माझी मुळींच इच्छा नाहीं. त्यांचा मला आतां मनस्वी तिरस्कार वाटतो. मी स्वतः सर्व सहन करीन. व्हायला नको होतं तें झालं. आतां माझ्या पोटांत दोन महिन्यांचा गोळा आहे. ......"

सुलभा सर्व प्रांजलपणानें सांगत होती. ती लाजली नाहीं, पण निर्लज्ज म्हणून नव्हे. तिच्या रक्तांत हिंदी आणि हंगेरीअन रक्तांचं मिश्रण होतं आणि ती निष्पाप अंतःकरणानें व आत्मविश्वासाच्या धीटपणानें आपली अवस्था स्पष्ट शब्दांत सांगत होती.

मातापितरांच्या अगाध प्रेमाचीं उदाहरणं जीवनांत सांपडतात. तशींच कांहीं वेळां सासूसासऱ्यांच्याही अगाध प्रेमाचीं दृष्टीस पडतात. त्यांतलंच एक दृश्य प्रो. लिखितेंच्या घरांत आज कुणालाही दिसलं असतं. सुलभेचा वृत्तांत ऐकल्यावर प्रथम बोलली ती तिची सासू—

" झालं तें झालं सुलभा; उगीच विचार नको करूंस. जाऊन नीज कशी."

" हूं सुलभा," प्रो. लिखित्यांनीं आपल्या पत्नीला दुजोरा दिला. " जा नीज. अन् मनाला नको कांहीं लावून घेऊंस. जरा जपून वागावं. पण त्याचं आतां काय. आतां उलट निष्कारण डोक्याला त्रास देत बसलीस तर आजारी पडशील. पाहून घेतां येईल पुढं. अग, आपल्या घराचं छप्पर देवाच्या आकाशाइतकं मोठं नाहीं पण तुझ्यावर सांवली धरण्यापुरतं आहे."

सुलभेनें प्रेम आणि कृतज्ञता यांनीं भरलेल्या डोळ्यांनीं त्या म्हाताऱ्या पतिपत्नीकडे बघितलं आणि ती निजायला आपल्या खोलींत गेली. सुलभेचं अंतःकरण इतकं निष्पाप होतं आणि प्रो. लिखिते व त्यांची पत्नी यांचीं अंतःकरणं इतकीं विशाल होतीं कीं वरील निवेदनानंतर दुसऱ्या दिवशीं त्या घरांतील वातावरणांत यत्किंचित्‌ही फरक झालेला कुणाला आढळला नसता. पण सुलभेच्या स्वभावांत व वृत्तींत मात्र या अनुभवानें स्थित्यंतर घडवून आणलं होतं. तात्त्विक ध्येयवादाच्या आसनावर पुरुष आणि स्त्री हा भेद विसरून आपण बसतों असं बरळणाऱ्या एका व्यक्तीशीं मैत्रीच्या भुलावणीनें आपण फसलों एवढा धडा ती शिकली. पण त्या पलीकडे तिचं

मन कुढं बनलं नाहीं; किंवा त्यावरून तिनें सर्वसाधारण असा एकदा खोटा निष्कर्ष काढला नाहीं. आणि सहवासानें प्रो. लिखिते आणि त्यांची पत्नी यांना सुलभेची इतकी पूर्ण पारख झाली होती कीं त्यांच्या मनांत तिच्याबद्दल भलतीच अढी बसणं शक्यच नव्हतं. वयोवृद्ध आणि हल्लींच्या युगाच्या अर्थानें तपोवृद्ध असं तें म्हातारं जोडपं होतं. अशा घराण्यावर स्वर्गातून अदृश्य पुष्पवृष्टि होत असेल काय? अर्थात् हें स्वर्ग आणि देव यांच्या आपल्या कल्पनांवर अवलंबून आहे! आणि सगळ्यांनीं त्यावर विश्वास ठेवण्याची जरूरीही नाहीं.

एक दिवस लिखित्यांच्या कुटुंबांत सासू, सासरा आणि सून विचार करीत बसलीं होतीं. एखाद्या सामान्य बेताची कौटुंबिक चर्चा चालावी तसंच त्यांचं बोलणं चालू होतं. मुख्य प्रश्न सुलभेनें पुढें काय करावं हा होता. प्रो. लिखिते आणि त्यांची पत्नी यांच्या मतें झालेल्या प्रकाराला निष्कारण महत्त्व न देतां सुलभेनें सासरींच राहावं असं होतं. डॉ. प्रभुणेसारखे जिव्हाळ्याचे मित्र जवळ असतांना इतर काळजी करण्याचं कांहीं कारण नव्हतं. पण सुलभेच्या मतें निष्कारण लोकापवाद त्यांना सहन करायला लावण्यापेक्षां कलकत्त्यास आपल्या वडिलांकडे जाऊन राहाणं बरं असं होतं. तिला जें योग्य वाटेल तें तिनें करावं असा शेवटीं सासूसासऱ्यांचा सल्ला पडला. सुलभेला त्यांना सोडून जाणं तसं बघितलं तर जिवावरच येत होतं. विशेषतः त्यांच्या घरांत सुलभा ही त्या वृद्ध जोडप्याची आशा, करमणूक आणि प्रीतिस्थान झालेली होती. पण त्यांचा वियोग झाला तरी कांहीं फार दिवस नाहीं अशी तिनें आपली स्वतःची समजूत घातली.

कलकत्त्याला जाणारी गाडी ज्या प्लॅटफॉर्मवर उभी होती त्या प्लॅटफॉर्मवर प्रो. लिखिते आणि त्यांची पत्नि उभीं होतीं. एका बायकांच्या सेकंड क्लासच्या डब्यांतून मान काढून सुलभा त्यांच्याशीं हंसत खेळत बोलत होती. गार्डानें शिटी फुंकली, हिरवं निशाण वर फडकाविलं आणि प्लॅटफॉर्मवर निरनिराळ्या जिनसा विकणाऱ्यांचा उत्साह मंदावला. दुसऱ्या क्षणीं गाडीनें शिटी दिली आणि ती चालूं लागली तसें सुलभेनें सासूसासऱ्यांचा निरोप घेतला.

"संभाळून जा अंऽ, अन् स्वतःला जप," सुलभेच्या सासूनें बजावलं.

"आणि पत्र नियमितपणें," प्रो. लिखितेंनीं बजावलं.

"हो हो. आणि तुम्ही पण एकमेकांना जपा. मी शक्य तितक्या लवकर परत येईन," सुलभेनें आवाज मोठा करून त्यांना सांगितलं. त्यानंतर बोलणं अशक्य होतं. पण एकमेक दृष्टिपथांतून गेले तरी सुलभा आपला हातरुमाल डब्याच्या खिडकींतून हात उंच करून फिरवीत होती.

कलकत्त्याच्या हौरा स्टेशनवर बॅरिस्टर मुकर्जींनीं जेव्हां आपल्या मुलीला बघितलं तेव्हां तिच्या चेहऱ्यावर पूर्वपरिचित अल्लड आनंदाच्या हास्याऐवजीं किंचित् वयस्क आनंदाचं सौम्य हास्य होतं. तिच्या मोहकपणाला एक नवीन स्वरूप प्राप्त झालं होतं पण त्याची आकर्षकता होती तशीच होती. घरीं गेल्यावर सुलभेनें सर्व हकिगत आपल्या वडिलांना सांगितली. ती ऐकत असतांना बॅरिस्टर मुकर्जी आपल्या खोलींत चिरूट ओढीत इकडून तिकडे

येरझारा घालीत होते. सुलभा थांबल्यावर ते तिच्या खुर्चीच्या मागें उभे राहिले आणि तिच्या पाठीवरून हात फिरवल्यावर आपल्या दोन्ही हातांच्या पंजांनीं त्यांनीं तिची हनुवटी उचलून तोंड वर केलं आणि तिच्या तांबूस गोऱ्या भालप्रदेशाचं वात्सल्याच्या आवेगानें चुंबन घेतलं !

सुलभेची सुटका झाली ती गर्भपातानें.

ती बरीच अशक्त आणि कृश झाली होती. पूर्वींची शक्ति परत आल्यानंतर सासरीं जाण्याचा तिचा विचार होता. तोंपर्यंत कलकत्त्यासच माहेरीं कांहीं दिवस ती काढीत होती. कांहीं तरी, फार श्रमाचा नाहीं असा, व्यवसाय पाठीमागें लावून घेतला म्हणजे वेळ बरा जाईल या उद्देशानें एका फौजी हॉस्पिटलमध्यें जखमी शिपा-यांची विचारपूस करायला, त्यांच्या सामान्य गरजा किंवा एवढ्या तेवढ्या सुखसोयी पुरवायला सकाळीं दोन चार तास जाऊन येण्याचा तिनें क्रम सुरू केला. त्या हॉस्पिटलमधील रुग्णशय्यांवरून किंचित् दुःखी आवाजांतून खालील शब्द कित्येक वेळां ऐकूं आले असते—

" वो लिखिते मेमसाब आयी है ! "

———

# ११. " थोडा द्ऽर्द ! "

" वो लिखितेबाई है वो आयी है ! "

शब्द जरी हिंदुस्थानी भाषेंतले असले तरी ते उच्चारले होते फौजी हॉस्पिटलमधल्या रुग्णशय्येवरील एका मराठा सैनिकानें.

शिवा घरांतल्या मंडळींचा निरोप घेऊन जड अंतःकरणानें बाहेर पडला आणि रस्त्यानें पळसखेड्याच्या ओळखीच्या मंडळींना राम राम करीत त्यानें स्टेशन गांठलं आणि तो सैन्यात दाखल झाला. नव्या सैनिकांच्या शिक्षणाकरितां जेथें छावणी उभारली होती तो प्रांत सृष्टिसौंदर्याच्या दृष्टीनें जरी अगदीं उत्कृष्ठ नसला तरी अगदींच नीरस नव्हता, आणि जमिनीशीं आजपर्यंत ज्याचं सगळं आयुष्य, जीवन निगडित झालं होतं त्या शिवाला निसर्गाच्या आजूबाजूच्या सामान्य दृश्यांतही अपूर्व शोभा आणि आपलेपणा आढळत होता. कित्येक वेळां तर नुसत्या माळरानाच्या खुरट्या गवतावरच नाहीं तर त्यावरील साध्या दगडधोंड्यावरही तो एकाद्या वेड्या लहान मुलाप्रमाणें आवडीनें बघत असे. सैन्याच्या शिक्षणाला जेव्हां त्यानें सुरवात केली तेव्हां त्याला प्रथम आपल्याला तें झेपेल कीं नाहीं अशी निष्कारणच भीति वाटत होती. पण एकदां सुरवात झाल्यावर त्याला त्याचे श्रम फारसे जाणवेनासे झाले. उत्तम पीळदार शरीराची त्याला आनुवंशिक देणगी होती आणि आपलें

शारीरिक बल त्यानें स्वतःच्या मेहनतीनें कमावलें होतें. शिवाय, शेतांवर उन्हातान्हांत खपण्याची त्याला संवय होती. त्यामुळें फौजी शिक्षणक्रमाच्या नित्य आणि नैमित्तिक दैनंदिनींत; परेड, ड्रिल, मार्च, मार्च, ड्रिल, परेड, यांच्या अखंड साखळींत; बंदुकीचें शिक्षण व तत्समान इतर अनेक व्यवसायांत त्याला विशेष त्रास-दायक असं कांहीं वाटलं नाहीं. उलट, मेहनतीच्या पण शिस्तीच्या सकाळ, दुपार व संध्याकाळच्या जीवनांत त्याला पूर्वी अपरिचित असा एक नवाच हुरूप वाटूं लागला. युद्धाच्या बदलत्या परिस्थितीनुसार फौजी शिक्षणाचा कार्यक्रम अर्थात् नेहमींपेक्षां अधिक झपाट्यानें उरकवण्याची जरूरी असल्यामुळें छावणींतील सैनिकांच्या वेळा-पत्रकांतील विषय साहजिकच एकापाठीपाठून एक भराभर बदलत. पण शेतकऱ्याच्या आयुष्यांत आळशीपणाला किंवा दिरंगाईला फारसा वांव क्वचित्च असतो त्यामुळें आपल्या वेळापत्रकांतील गर्दीचा शिवावर फारसा परिणाम होत नव्हता; इतकंच नव्हे तर नवीन नवीन विषयांचा अभ्यास करण्यांत व सैनिकाला आवश्यक अशा संवयी लावून घेण्यांत शिवाला दिवस कसा जातो याचीच मौज वाटे.

शिवाच्या तुकडींत फक्त मराठा सैनिकच नव्हते. हिंदुस्थानां-तल्या निरनिराळ्या भागांतून आलेल्या भिन्नप्रांतीय आणि भिन्न-धर्मीय लोकांचा त्या तुकडींत समावेश होता. त्या सर्वांचा कार्यक्रम सामुदायिक शिस्तीच्या खेळीमेळीनें आणि आनंदानें पार पडत असे. त्या कार्यक्रमाच्या पार्श्वभूमीवरून जरी त्यांच्या रणांगणावरील पुढील खऱ्या कार्याची अस्पष्ट कल्पना विरघळलेली होती तरी तिचा

तात्कालिक असा फारसा परिणाम दिसत नव्हता. आपल्या बरोबरीच्या सैनिकबंधूंमध्यें शिवानें बरेच मित्रही संपादन केले होते. त्याच्या कुस्ती खेळण्यांतल्या कौशल्यानें त्याला आपल्या मित्रांकडूनच नव्हे तर अधिकाऱ्यांकडूनही वहावा मिळाली होती. एकदां छावणींतल्या सैनिकांनीं एक दिवस आपसाआपसांत कुस्तीचे सामने खेळण्याचें ठरविलं. त्यांत शिवानें जिंकलेल्या एका कुस्तीचं आणि त्यानंतर त्याच्या अधिकाऱ्यानें त्याची पाठ थोपटली त्याचं आपल्या मोडक्या-तोडक्या भाषेंत पण रसभरित असं वर्णन लिहवून त्यानें कोंडीबाला पाठविलं होतं तें वाचवून घेतांना सारजाला आकाश ठेंगणं झालं होतं. त्याशिवाय त्यानें फुटबॉल खेळायला सुरवात केली होती आणि एका पंजाबी मित्रानें दिलेले जरदाळू खाल्ले होते.

पण या सर्व कार्यक्रमांत दिवस गेल्यावर मेहनतीमुळें त्याला जरी रात्रीं झोंप लवकर लागत असे तरी अंथरुणावर पडल्यावर पूर्णपणें निद्रावश होण्यापूर्वी त्याचं मन घराच्या हुरहुरीनें भरून जात असे. लढवय्या झाला तरी त्याला अन्तःकरण हें असतंच ! पळसखेड्यांतल्या जीवनांतील लहान लहान गोष्टी कीं ज्यांचा विचार पळसखेड्यांतच असेपर्यंत त्यानें कधीं फारसा केला नव्हता त्या त्याला एकदम आठवत. भवानीच्या जत्रेंतले रणमल्ली; पावसाळ्या-नंतर वर आलेलं मळ्यांतल्या विहिरीचं पाणी; शाळा सुटल्यानंतर घरीं परत जातांना तोंडांत उंसाचा चोयटा, डोक्यावर वाकडी टोपी असा संवगड्यांना वांकुल्या दाखवीत पुच्छगतीनें चालणारा तुक्या; शेतावर काम करणाऱ्या बायकांच्या सांघिक गाण्यांतलीं अर्धचरणें; अंबाडीचा दोर वळणारा कोंडीबा; सकाळीं डोक्यावर पदर घेऊन

घर झाडणारी सारजा; मळ्यांतल्या बैलांना नाला मारण्याची जरूरी; रामकिसन हलवायाची शेव; बलभीम आखाड्यांतली हनुमानजयंति; जोंधळ्याच्या भारानें फुललेलीं शेतं; दाराशीं बारा वाजतां न चुकतां येणारं कुत्रं; रात्रींची "अल्ला के प्यार, कुछ दुनियाके"ची गस्त; शेणाच्या गोऱ्या थापणारी शेवंती; मळ्यांतल्या ताज्या वांग्याचं भरीत करणारी आई; चावडीवरचा डोक्याला टक्कल पडलेला महालकरी; अशीं कितीतरी विविध दृश्यें आपल्या स्मृतिपटलावर एकामागून एक चितारलेलीं किंवा सरमिसळ पद्धतीनें रंगलेलीं शिवा रोज झांपड आलेल्या डोळ्यांनीं पाहात असे. आणि त्या स्मृतिपटलाच्या अद्भुत किमयेनें एरव्हीं हास्यप्रधान वाटणाऱ्या गोष्टींत अचानकपणें कारुण्याचा रंग भरला जाई आणि एरव्हीं करुण वाटणाऱ्या दृश्याची हास्यकारक बाजू अभावितपणें प्रतीत होई. आणि शेवटीं, फाटलेल्या मोटेला ठिगळ लावून घ्यायचं कोंडीबाला कसं काय जमेल या किंवा याचसारख्या सामान्यतः क्षुल्लक पण दूरस्थ दृष्टींत अवाजवी महत्त्व पावलेल्या विचारांत शिवा बहुधा झोंपेच्या स्वाधीन होई.

अशा रीतीनें दिवसामागून दिवस गेले आणि सैन्यांत लागणारं सर्वांगीण पण जलदपणें उरकलेलं शिक्षण संपवून शिवा यथार्थतेनें रणांगणावर जाण्याला योग्य असा सैनिक झाला. मानवी स्वातंत्र्याच्या रक्षणाकरितां आणि जागतिक जीवनांत सभ्यतेची चाड राहावी म्हणून, प्रगमनशील मानवी संस्कृतीचा विध्वंस करावयास उद्युक्त झालेल्या हुकूमशाही पाशवी शक्तीचें पारिपत्य करण्याकरितां

तळहातावर शीर घेऊन सज्ज झालेल्या अगणित सैनिकांच्या दलांतला तो एक खरा शिपाई गडी बनला.

अक्षांश रेखांशाचे आंकडे देऊन किंवा इतर भौगोलिक तपशील देऊन शिवा आपल्या तुकडीबरोबर कुठल्या रणक्षेत्रावर गेला हें सांगण्यांत या ठिकाणीं फारसं स्वारस्यही नाहीं आणि त्याची जरूरीही नाहीं. जिथें जगभर युद्धाची आग पसरत आहे तिथें अमुक ठिकाणीं किंवा अमुक रणक्षेत्रावर चटका बसला कीं तमुक ठिकाणीं वा तमुक रणक्षेत्रावर, हें वर्णन केल्यानें त्या चटक्याच्या वेदनांत आणि त्या वेदना सहन करतांना वाटणाऱ्या समाधानांत अधिकउणं थोडंच होणार आहे! आणि इथें महत्त्व आहे तें या चटक्यांचं; शिवाच्या रणक्षेत्रावरील अनुभवांचं; त्या अनुभवांच्या अनुषंगानें त्याच्या मनावर झालेल्या अपेक्षित अनपेक्षित परिणामांचं! कांहीं वेळां रणक्षेत्रावरील प्रसंगांनीं शिवाच्या हृदयांतील परंपरागत कल्पनांना एक प्रकारची नवीन स्फूर्ति मिळे तर इतर वेळां त्यांना जोराचा धक्का बसे. क्वचित् मानवी अंतःकरणांतील सूक्ष्म पण वैभव-शाली स्फुल्लिंगें अद्वितीय तेजांत परिणत झालेलीं दिसत, तर क्वचित् त्या अंतःकरणांतील स्थूल संस्कारांचाही डोलारा क्षणांत ढांसळलेला भासे! या सर्व प्रकारांचा शिवावर साकल्यानें परिणाम झाला. आणि त्याचीच प्रस्तुतता या वृत्तांतांत अधिक आहे. पण त्या परिणामाचं वर्णन केलं तर तें वस्तुस्थितीला धरूनच आहे अशी हमखास ग्वाही कुणाला देतां येईल ? कारण, या वर्णनांत साहजिकच शाब्दिकच नव्हे तर अर्थदृष्ट्याही एक प्रकारचा विवक्षितपणा येणारच; त्या संक-लित परिणामाचं चित्र रेखाटतांना कुंचल्याचे हात निरनिराळ्या

मर्यादा दाखविणारच. हा विवक्षितपणा, ह्या मर्यादा परमार्थानें खऱ्या आहेत कीं त्यांचा वर्णनकारानें आपल्या कल्पनाशक्तीनें मूळ सत्यावर आरोप केला आहे याचं निश्चित निदान कसं करतां येणार ! कारण, अशिक्षित शेतकऱ्यांच्या भावना किंवा विचार यांना संस्काराच्या अभावीं निश्चित, स्पष्ट, असंदिग्ध अशी रूपरेषा नसते; त्यांना फक्त आकृतिहीन पण जिवंत असा गाभा मात्र असतो. अशा परिस्थितींत निवेदनाच्या सोयीकरितां आणि शाब्दिक चित्रणाच्या सौकर्याकरितां त्या गाभ्याला एका प्रसंगाच्या स्वरूपांत रूपरेषा दिली तर चिन्हमात्र म्हणून त्या प्रसंगाचं महत्त्व खात्रीनें पटायला हरकत नाहीं. आणि मनःस्थितीच्या गुंतागुंतीचं या पद्धतीशिवाय दुसऱ्या कोठल्या पद्धतीनें अधिक समर्पक वर्णन करतां येणार !

आणीबाणीच्या बऱ्याच प्रसंगांतून शिवा अनेकदां गेला. एकदां एका ब्रिटिश तुकडीबरोबर त्याच्या तुकडीला एक महत्त्वाचं रेल्वेचं स्टेशन असलेल्या शहराची फळी संभाळून धरावयाची होती. शहराच्या दक्षिणेकडून शत्रूच्या कांहीं तुकड्या शहरावर चाल करून येत होत्या. त्यांच्या उजव्या बगलेवर हल्ला करण्यांचं काम त्याच्या तुकडीकडे होतं. शहरावर आपलं पायदळ घालण्यापूर्वी शत्रूच्या विमानांनीं शहरावर बॉंबगोळयांचा हल्ला करायला सुरवात केली होती. शिवा आपली बंदुक घट्ट धरून दबा धरून बसला होता. तेथून त्याला शहराचा जो भाग लांबून दिसत होता त्यात शहरांतल्या कांहीं हिंदु आणि मुसलमान लोकांनीं आपआपल्या जातभाई लोकांकरितां बांधलेलं एक मारुतीचं मंदिर आणि एक मशीद होती. शत्रूच्या बॉंबच्या हल्ल्यांत दोन बॉंब नेमके त्या दोन पवित्र सम-

जळ्या जाणाऱ्या इमारतींवर पडले आणि क्षणार्धांत त्यांचा चक्काचूर झाला. मारुतीच्या देवळावर बॉम्ब पडून ते कोसळत असतांना जेव्हां शिवानें पाहिलं तेव्हां त्याच्या हृदयाला जोराचा धक्का बसला. एका विशिष्ट परंपराशिक्षित विचारप्रणालीवर उभार-लेल्या त्याच्या धार्मिक म्हणा किंवा अध्यात्मिक म्हणा भावनांच्या मंदिराचं शिखरही त्याच क्षणाला कोसळलं. देवस्थानं जिवंत अस-तात; त्यांच्यांतून देव आपलं अतुल दैवी सामर्थ्य वेळ आली तर प्रगट करूं शकतो; या आणि यांसारख्या अनेक स्थूल पण भोळया भावानें विश्वास ठेवलेल्या कल्पनांचा डोळयांसमोरच्या दृश्यानें फोलपणा सिद्ध केला जात असतां शिवाचं अन्तःकरण भांबावलं; त्याच्या साध्या हृदयांत भकासपणा आला! कदाचित् या शहरांतल्या लोकांचा त्या देवस्थानावर विश्वास नसेल म्हणून तें देवस्थान प्रगट झालं नाहीं; कदाचित् आपली श्रद्धा उणी पडली असेल; कदाचित् निराळ्या ठिकाणीं निराळ्या स्वरूपांत तें प्रगट होणार असेल; अशा एक ना अनेक विचारांनीं शिवानें आपलं समाधान करण्याचा प्रयत्न केला. पण त्याच्या भोळया आणि भाविक मनाला भगवान् राम-चंद्राला सीतेसाठीं लंकादहन करून ज्यानें आपल्या पराक्रमानें सहाय्य केलं त्या मारुतीनें आजूबाजूला संहार चालू असतांनाही स्वतःला प्रगट करूं नये याची निश्चित संगति लावतां येईना. शिवासारख्या शेतकऱ्याच्या अध्यात्मिक आणि धार्मिक कल्पना त्या काय असणार! पण त्यांच्यांत त्या दृश्यानें क्रांति केली. वाळलेल्या वेलीवरचा जाळीदार शिरांचा झिरझिरित पाचोळा सोसाट्याच्या वाऱ्यानें दाही दिशांना भिरकावून द्यावा त्याप्रमाणें

सामान्यतः दगडाच्या मूर्तिभोंवतीं गुरफटलेल्या आणि वर्षानुवर्षांच्या संस्कारांत रुजलेल्या त्याच्या ईश्वरविषयक कल्पनांचं रसहीन जाळं त्या अनुभवानें विस्कळित केलं आणि धुळींत मिळवलं.

आणि चोहों बाजूंनीं कानठळया बसविणाऱ्या गडगडाटांत अंतस्थ बावरलेल्या वृत्तीनं मारुतीचं स्मरण करीत असतां शिवाला अस्पष्ट कल्पना आली कीं दगडमातीचा देव स्वतःचंही संरक्षण करूं शकत नाहीं, तर त्याच्या भक्तांचं कुठें! पण खरा देव भक्तांतून प्रगट होतो आणि स्वतःचं आणि त्यांचंही खरं संरक्षण स्वतःच्या आणि त्यांच्याही आहुतींनीं करतो.

हृदयांतल्या परस्परविरोधी विचारांच्या गोंधळांतच शिवानें बंदुकीला संगीन लावली. त्याची सर्व तुकडी जिवाची पर्वा न करतां शत्रूंवर संगिनींच्या टोंकांनीं तुटून पडली. आपली बगल उधळलेली पाहून शत्रूनें शहरापुढें हार खाल्ली. पण धुंद धडाडीनें मारुतीचं मनांतल्या मनांत नांव घेऊन पुढें गेलेला शिवा घायाळ होऊन रणांगणावर पडला होता. लढतांना आसपास जखमी झालेल्या शिपायांच्या रक्तानें रंगलेली तांबडी माती त्याला दिसली होती. तो स्वतः जखमी होऊन पडला तेव्हां ग्लानी आलेल्या डोळयांनीं त्यानें स्वतःच्या रक्तानें रंगलेली काळसर तांबडी माती बघितली!

त्याच्या तुकडीवरच्या ब्रिटिश अधिकाऱ्यानें त्याला पाठीवर घालून रणक्षेत्राच्या पिछाडीस आणलं. त्याच्या जखमा बांधल्यावर थोड्या वेळानें त्याला किंचित् हुशारी वाटली. पण त्यापूर्वीच त्यानें

कृतज्ञतेनें भरलेल्या नजरेनें आपल्या अधिकाऱ्याकडे बघत बघत अस्पष्ट शब्द उच्चारण्याचा प्रयत्न केला होता—

" थोडा दऽर्द...आपकू तकलीफ होई..."

आणि त्या ब्रिटिश अधिकाऱ्यानें त्याचा हात आपल्या हातांत घेऊन त्याला हंसत उत्तर दिलं होतं—

" कुच् तकलीफ नही...शूर मुला, लवकर बरा हो ! "

शिवाच्या जखमा रणक्षेत्रावरल्या हॉस्पिटलमध्यें पूर्णपणें बऱ्या होण्यासारख्या नव्हत्या. त्यामुळें तात्पुरता इलाज त्यांवर केल्यानंतर त्याला रणक्षेत्रावरून परत पाठविलं होतं. कलकत्त्याच्या हौरा स्टेशन-वरच्या एका प्लॅटफॉर्मवर जखमी शिपायांनीं भरलेली एक गाडी रात्रीं ९॥ वाजतां लागली. त्या गाडीच्या एका डब्यांतून स्ट्रेचरवर घालून शिवाला बाहेर काढलं होतं आणि त्याची कलकत्त्याच्या एका फौजी हॉस्पिटलमध्यें रवानगी करण्यांत आली होती. त्या हॉस्पिटल-मध्यें त्याची व्यवस्थाही नीट लागली होती. प्रथम कांहीं दिवस त्याच्याच शेजारच्या रुग्णशय्येवरचा एक पंजाबी त्याची करमणूक करीत असे. पण शिवाला मुख्य एक अडचण भासायची. ती म्हणजे घरीं पाठवायचं पत्र लिहून घेण्याची. पण लवकरच त्याची आणि त्या हॉस्पिटलमध्यें जाणाऱ्या सुलभेची ओळख झाली. आणि ठर-लेल्या दिवशीं ती नियमानें त्याचं पत्र लिहून देऊं लागली.

" वो लिखिते बाई है वो आयी है ? " शिवानें आज पत्र लिहिण्याचा दिवस म्हणून शेजारच्या पंजाबी मित्राला विचारलं. इतक्यांत सुलभा तिथें आली.

" काय शिवा, बरं वाटतं का आज ? "

" हाय बाई, जराक बरं हाय. दाक्तर काय म्हन्त्याती ? "

" डॉक्टर म्हणतात आतां लवकर बरा होशील तूं," सुलभा उत्तेजन देत म्हणाली. " ही कोपरावरची जखम भरत येते आहे ती भरली कीं कोपराचं हाड बसवतील ते. " असं म्हणून तिनें त्याच्या कॉटजवळ खुर्ची ओढली आणि त्याच्या उशीखालचं पोस्ट-कार्ड हळूंच काढून घेऊन त्यावर लिहायला सुरवात केली—

" कोंडीबादादास,

शिवाचे प्रेमपूर्ण अनेक दंडवत..."

" हं, काय लिहायचं आज ? "

" तुमीच काय ते लिवा नेहमीपरमानं. खुशाल हाय लिवा अन् जरा उठायला आलं की घरला येनार हाअे म्हनावं."

—✻—

# १२. कोंडीबा आणि सारजा

पळसखेड्याच्या पत्त्यावर पाठविलेलं शिवाचं पत्र कोंडीबाला मिळालं तें पळसखेड्यांत नाहीं तर त्या जिल्ह्याच्या गांवीं. थोड्याच दिवसांपूर्वी कोंडीबा आणि शिवाची आई शेवंतीला आणि सारजेला बजाबा पाटलाच्या घरीं तात्पुरतें ठेवून जिल्ह्याच्या गांवीं बिऱ्हाड करून रहावयाला गेलीं होतीं. तिथें कोंडीबानें एका कारखान्यांत नोकरी धरली होती. युद्धामुळें त्या कारखान्याचं काम आणि पसारा सारखा वाढत होता आणि कोंडीबा वयानें जरी पन्नाशी उलटलेला होता तरी त्याला कारखान्यांत जागा मिळायला फारसा त्रास पडला नाहीं. पळसखेडं सोडतांना मात्र त्याच्या मनाला त्रास झाला. पण सद्यःस्थितींत त्याशिवाय इलाज नव्हता. कारण, त्याची जमीन त्यानें सरकारला विकली होती. युद्धाच्या कामाकरितां ती सरकारनें घेतली होती. अर्थात् ती जमीन घेतांना सरकारनें कोंडीबाला भरपूर मोबदला दिला होता. जमीन आपण युद्धाच्या जरूरीच्या उपयोगाकरितां विकतों आहोंत—ज्या युद्धावर आपला शिवा आपण पाठविला त्या युद्धालाच एका अर्थानें आपण हा हातभार लावीत आहोंत या विचारानें कोंडीबा आणि शिवाची आई एकमेकांचं सांत्वन करीत होतीं. सांत्वन हें वेडं असतं. आणि जमिनीच्या लेकरांचं वेडेपण जमिनीला कळतंही !

कोंडीबानें जमीन विकली त्यावेळचा प्रसंग हृदयस्पर्शी होता. शेतकऱ्याला जमीन म्हणजे जीव कीं प्राण. अंग मोडून उन्हातान्हांत तिची मशागत केलेली! सरकारनें भरपूर मोबदला दिला, जमीन युद्धाकरितां आनंदानें दिली तरी हृदयाला वेदना झाल्याशिवाय कशा राहणार! पैसा हा चंचल स्त्रीप्रमाणें तर जमीन ही आई-प्रमाणें! आणि आतां त्या जमीनीपैकीं एक फक्त मळा आणि त्यांतली विहीर कोंडीबाची होती. जी जमीन हलक्या हाताच्या कौशल्यानें आज इतकीं वर्षें नांगरली तिच्यावर निराळ्या अर्थानें नांगर फिरतांना बघून कोंडीबाच्या हृदयाचं पाणी झालं. त्याच्या हातानें दाबलेला नांगराचा फाळ त्या काळ्या जमिनींत शिरला कीं जमीन कशी आनंदानं उलून वर येत होती! समांतर रेषांवर नांगरानें पाडलेले चर बघितले तर जमीन लांबवर जणूं लाटा उठलेल्या समुद्राप्रमाणं हंसायची! आणि अंगावर घाम डबडबला म्हणजे जोंधळ्यावर दाणा फुलायचा आणि भरायचा! शेतकऱ्याच्या दृष्टीनें पैसा ही मनुष्याची देणगी असते, पण जमीन ही परमेश्वराची कृपा असते.

आणि शेती गेली तरी शेतीच्या संवयी जात नाहींत!—

म्हणूनच कोंडीबा दररोज मळ्यावर जायला चुकत नव्हता. वास्तविक पाहतां येवढासा मळा तो काय आणि त्याची काळजी ती किती घेणार! पण कोंडीबा मळ्यावर कामाकरितां मुळीं जातच नव्हता. घरांतल्या विषण्णतेचं वातावरण ‘शिवा नाहीं कां कांहीं दिवसांनीं परत येणार तशी जमीनही युद्ध संपल्यावर परत येईल,’

अशा आशावादानें सफाईदार रीतीनें नाहींसं करणाऱ्या कोंडीबाला कुठं तरी हृदय हलकं करणं आवश्यक होतं. मळ्यांतल्या विहिरीवर एकटीच बसलेल्या, शून्य मनानें समोरच्या शेतांकडे बघणाऱ्या कोंडीबाच्या थोड्याशा थकलेल्या मूर्तीपेक्षां अधिक हृदयस्पर्शी दृश्य क्वचित्‌च असेल. तांबूस पांढरं गुडघ्यापर्यंत एक मांजरपाटी धोतर, अंगांत तसल्याच रंगाचं कुडतं, खांद्यावर तसलंच एक धोतर आणि डोक्याला विटलेल्या रंगाचं तांबडं पागोटं असा कोंडीबा मळ्यावर येई, विहिरीवर बसे आणि डोक्याचं पागोटं काढून बाजूला ठेवी; कपाळावरचे घामाचे बिंदू खांद्यावरच्या धोतरानें टिपून घेई; आणि नंतर डोक्यावरचे पांढरे केंस वाऱ्याच्या झुळुके-वर उडताहेत, तोंडावर वयानें न पडलेल्या सुरकुत्या, डोळ्यांतून संथपणें टप्‌टप्‌ टप्‌टप्‌ एकेक अश्रू गळत आहे अशी ती म्हातारी मूर्ति भावनावेगानें करुणगंभीर होई. त्या निश्चल, करुणगंभीर म्हाताऱ्या मूर्तीला बघून स्वर्गातल्या देवांनाही जमिनीवर येऊन कोंडीबाला स्नेहभरानें पोटाशीं घट्ट धरण्याचा मोह आवरतां आला नसता!

पण स्वर्गात देव असतील तर ते पृथ्वीवर येणार!

तोंपर्यंत समोरचं आंब्याचं झाड खालीं ओढलं गेलं; जमीन खणली गेली; विटा, माती, लोखंड, लाकूड, यंत्रं, माणसं आलीं आणि एका इमारतीचा पाया घातला गेला. कोंडीबा दिवसांमागून दिवस तें पाहात होता.

एक मोठी आशा होती. सरकारनें भरपूर मोबदला तर दिलाच होता पण त्याहूनही विशेष म्हणजे युद्ध संपल्यावर ती सर्व

जमीन कोंडीबाला परत देण्याचं आश्वासनही दिलं होतं. कोंडीबाच्या मनांत आलं निदान शिवाला तरी जमीन खास लाभेल!

आणि स्वर्गांत देव असोत किंवा नसोत पण पृथ्वीवर श्रीमंत कारखानदार असतात आणि त्यांना मजूरही हवे असतात.

कोंडीबाच्या आणि बजाबाच्या कुटुंबांत एकंदर परिस्थितीचा खल होऊन असं ठरलं कीं बजाबानें कोंडीबाच्या मळ्याकडे पाहावं आणि कोंडीबानें जिल्ह्याच्या गांवीं जाऊन कारखान्यांत नोकरी धरावी. त्याप्रमाणें कर्मधर्मसंयोगानें कोंडीबाला नोकरी मिळाली. पगार एरव्हीं मिळाला असता त्यांपेक्षां एक रुपाया जास्तही मालकानें दिला; कारण युद्धपरिस्थिति. युद्धपरिस्थितीमुळें कारखान्याच्या मालकाला किती फायदा होत होता कुणास ठाऊक. पण सर्वच फायदा कारखानदाराला कांहीं मजुरांवर खर्च करणं शक्य नसतं; कारण आज फायदा झाला तरी उद्यां होईलच अशी खात्री नसते. तेव्हां अर्थशास्त्राच्या दृष्टीनें आणि सामान्य व्यवहारी समंजसपणाच्या दृष्टीनेंही कारखानदाराला कितीही फायदा झाला तरी कोंडीबाला एक रुपायापेक्षां अधिक जादा पगार मिळणं संभवनीय नव्हतं. दुसरं म्हणजे पगार कमी झाला तर मजुराला आपला कौटुंबिक खर्च कमी करतां येणं शक्य असतं, पण फायदा कमी झाला तर कारखानदाराला थोडाच आपला कौटुंबिक खर्च कमी करतां येतो! तेव्हां कोंडीबाला मिळालेल्या पगारांत आनंद मानायला सबल कारणें होतीं.

जिल्ह्याच्या गांवीं बिऱ्हाड करून प्रथमच राहावयाचं; त्यामुळें दोनही कुटुंबांच्या मतें सारजा आणि शेवंतीनें कांहीं दिवस तरी

पळसखेड्यांतच बजाबाकडे राहाणं इष्ट असं ठरलं. एकदां नवीन ठिकाणीं सर्व व्यवस्था लागली म्हणजे अगोदर सारजाला आणि नंतर शेवंतीला कोंडीबा बोलावून घेणार होता. आणि त्या निश्चया-प्रमाणें त्यानें बजाबाला पत्र पाठवून सारजाला धाडायला सांगितलं. पळसखेड्यापासून जिल्ह्याचं गांव कांहीं फारसं लांब नव्हतं आणि बैल बजाबाच्या शेतांवर गुंतले असल्यामुळें सारजानें पायींच प्रवास करायचं ठरविलं. संध्याकाळच्या सुमारास सारजानें बजाबाचा आणि आपल्या आईचा निरोप घेतला. पण शेवंती आपल्या आईबापांकडे जायला आणि शहर बघायला उतावीळ झाली होती. तिची समजूत घालतां घालतां सारजाला अंमळ उशीर झाला.

"तुमी येकल्या जाताया अन् आमास्नी काय म्हून नाइ न्यायचं ?" शेवंती रडक्या रुसव्यानें म्हणत होती.

"पन् कोन म्हनतं नाइ म्हून ?" सारजानें तिला जवळ ओढून कुरवाळीत म्हटलं. "जरा मी जाउन्शान् बघत्ये गांवाला कसं काय बिऱ्हाड झालं हाय अन् मंग मी अन् सासूबाई येक दिस ततं राहूं अन् दादाजी येऊनशान् नेतील तुमास्नी."

"अन् आमास्नी हतं एकल्यावानी..."

"पन् माय हाय ना शेवंती, अन् तुक्या हाय," सारजानें पळसखेड्यांच्या करमणुकींचं सुरस वर्णन करायला सुरवात केली. "अन् आपली काळी गाय व्याल् अन् तुमास्नी गोऱ्हा पायजे ना ?"

पण शेवंतीचं समाधान होणं शक्य नव्हतं आणि सारजाला फार वेळ दवडणं शक्य नव्हतं. तेव्हां शेवटीं, शेवंतीच्या डोकी-

वरून आणि पाठीवरून हात फिरवीत सारजानें तिला आश्वासन दिलं कीं पुढच्या आठवड्यांत कोंडीबा तिला खास घेऊन जायला येईल म्हणून. आणि ती निघाली.

" सांभाळून जा बरं कां, सारजा, " तिची आई उद्गारली.

" होय तर. "

" लुगडं चोळी अन् काय बर्बर न्यायचं समदं नीट घेतलं कां बांधूनशान् ? "

" घेतलंय समदं या गठुड्यांत अन् काइ बि लागलं बिगलं तर मामंजींच्या संगं अन् शेवंतीच्या संगं धाडायला सांगन. "

" अन् कोंडीबास्नी सांग शिवाची चिठीबिठी आली तर कुनाबी संगं निरोप द्यायला इसरूं नका म्हनावं. अन् तूं बी इसरूं नको बरं कां ! "

" नाय इसरणार. "

" अन् म्हादबाची तानी कदीमंदी भेटली तर इच्यारलं म्हून सांग. "

" हंऽ, " म्हणून सारजानें गाठोडं उचललं आणि शेवटीं एकदां ती घराच्या बाहेर पडली व जिल्ह्याच्या गांवाच्या रस्त्याला लागली.

संध्याकाळ हळू हळू अंधारायला लागली होती. हिरवी सुताची साडी नेसलेली, डोक्यावर पदर आणि हातांत गांठोडं घेतलेली सारजा रस्त्याच्या बाजूनें पाय उचलीत होती. कपाळावर केंसांच्या एक दोन बटी, आणि तांबडं कुंकू. हातांत सोन्याच्या

पाटल्या व हिरव्या तांबड्या बांगड्या. दिसण्यांत देखणी आणि गळ्यांत सोन्याचा दागिना. सारजा आपल्या विषण्ण तंद्रींत पाय उचलीत होती. शेतांवरून घराला परतणारे शेतकरी ओळखीनें विचारपूस करीत त्यांना सस्मित चेहेऱ्यानें दोन शब्द देऊन सारजा पाय उचलीत होती.

जिल्ह्याच्या गांवीं एका लहान खोलींत मिणमिण दिव्याच्या अंधारांत कोंडीबा आणि शिवाची आई एकमेकांशीं बोलत सुनेची वाट पहात होतीं. सुलभेनें लिहिलेलं शिवाचं पत्र कोंडीबाला त्याच दिवशीं सकाळीं मिळालं होतं. पण शिवा हॉस्पिटलमधून बरा होऊन सुटला म्हणजे कांहीं दिवसांची रजा काढून सगळ्यांना भेटायला येणार आहे ही आनंदाची बातमी पळसखेड्याला सारजाला कळवायला मिळालं नव्हतं कोंडीबाला. पण आतां त्याचं फारसं दुःख नव्हतं म्हणा, कारण सारजाच येणार होती संध्याकाळीं.

“ यायची येळ जाली नवं कां ? ” शिवाच्या आईनें विचारलं.

“ हां, पर् दिसत नाई. पळसखेड्यास्नं निघाली नसल सांजची. पहांटला यईल कदांचित्. ” कोंडीबानें उत्तर दिलं.

आणि डाव्या हाताला कळ लागली म्हणून गांठोडं उजव्या हातांत घेऊन नाकांतल्या नथेसमोर पाहात सारजा पाय उचलीत होती.

पण सारजा त्या संध्याकाळीं जिल्ह्याच्या गांवीं पोहोंचली नाहीं.

संध्याकाळच्या सांजप्रकाशांत पूर्वेला एक तारा अगदीं अंधुक दिसत होता. रस्त्यावरील बाजूंच्या झाडांच्या फांद्यापानांतून त्याचा नजरेनें माग धरीत सारजा पाय उचलीत होती. इतक्यांत पाठी-

मागच्या झाडांच्या सावल्यांतून दोन व्यक्ती चाहूल न लागूं देतां दबकत बाहेर आल्या आणि त्यांनीं सारजाला तोंडांत बोळा दाबून पकडलं आणि तिला उचलून ते पसार झाले.

जिल्ह्याच्या गांवीं एका लहानशा विटामातीच्या खोलींत एक म्हातारं जोडपं सुनेची डोळे भरून वाट पाहत होतं.

पळसखेड्यांत आपल्या जुन्या घराच्या पडवींत बसून दुसरं एक म्हातारं जोडपं आपली मुलगी एव्हांना सासरीं पोहोंचली असेल म्हणून खिन्न पण शांत मनानं तिची आठवण करीत होतं.

कलकत्त्याच्या एका दगडचुन्याच्या फौजी हॉस्पिटलमध्यें हॉस्पिटलच्या विजेच्या दिव्यांच्या मंद प्रकाशांत झोंपेची आराधना करीत रुग्णशय्येवर पडलेला एक तरुण आपल्या पत्नीच्या स्मृतीनें विरहाकुल होत होता.

—आणि त्या सर्वांच्या विचारांचा विषय झालेली सारजा कुठेंतरी बेशुद्ध, विचारशून्य पडली होती.

—*—

# १३. डॉ० व्हॉन्स्की

कलकत्त्यांतील आय्. सी. एस्. मधल्या एका तरुण अधिकाऱ्याच्या सुशोभित दिवाणखान्यांत संध्याकाळची मद्यप्राशन पार्टी जमली होती. पार्टी लहानच होती आणि ती भरविली होती भाई कुमारांच्या निमित्त. सरकारी कामाकरितां काढलेल्या आपल्या दौऱ्यांत भाई कुमार कलकत्त्याला आले होते आणि त्यांना योग्य ते लोक खासगी रीतीनें भेटायला मिळावे म्हणून ते ज्यांच्याकडे उतरले होते त्या कुटुंबानें ही पार्टी जमवून आणली होती. त्या कुटुंबांतील नवरा–बायको आणि भाई कुमार यांखेरीज बोलावलेल्या मंडळींत एक ऑस्ट्रेलिअन बाई, एक आयरिश पत्रविशारद, एक रशिअन डॉक्टर आणि त्याची मुलगी एवढेच लोक होते. त्यांपैकीं डॉ० व्हॉन्स्की आणि त्यांची मुलगी यांखेरीज बाकीची निमंत्रित मंडळी अगोदरच आली होती.

दिवाणखान्यांतल्या मधल्या कोचावर मिसेस रिक्फर्ड बसली होती. मिसेस रिक्फर्ड ऑस्ट्रेलिअन होती आणि कुठल्यातरी ऑफिसांत ५००–६०० रुपायांवर नोकरी करीत होती. ती नक्की काय करीत होती कुणास ठाऊक, पण एकंदर बोलण्यावरून आणि वागणुकीवरून तिच्यावर बरींच महत्त्वाच्या जबाबदारीचीं कामें सोंपवलीं असावींत असा तर्क करतां आला असता. लढाई सुरू झाल्यानंतर तिला

नेहमींप्रमाणें ऑस्ट्रेलिआला सुटीकरतां जाऊन यायला मिळालं नसल्यानें मायभूमीचा अस्पष्ट विरह तिच्या भाषणांतून दृग्गोचर होत होता. शरीरयष्टी जरा उंच आणि लठ्ठशी; अंगांत पिंवळसर रंगाचा व हिरव्या निळया फुलांचा फ्रॉक; आणि खूप बोलकी. तिच्या शेजारीं आयरिश पत्रविशारद बसला होता. पत्रविशारदांचा रणभूमीवरला खाकी युनिफॉर्म घातलेला; तोंडांत पाईप; आणि बोलण्यापेक्षां ऐकण्यांत आनंद मानणारा, तीक्ष्ण दृष्टीचा, बहुश्रुत आणि वेळ आलीच तर वादांत पूर्णपणें रंगणारा. त्यांच्या समोरच्या एका खुर्चीवर भाई कुमार आणि दुसऱ्या खुर्चीवर घराचा यजमान तो आय्. सी. एस्. मधला अधिकारी असे बसले असून घराची मालकीण कोपऱ्यांतल्या एका लहान टेबलावर ठेवलेल्या मद्यांच्या बाटल्यांतून प्रत्येकाला लहान पेले भरून देत होती.

मिसेस रिक्फर्ड आपल्या ऑफिसमधले लोक नालायक नाहीं तरी किती हलगर्जी व बेशिस्त काम करणारे आहेत आणि आज आपल्याला कसा विलक्षण कामाचा बोजा उचलावा लागला याचं रसभरीत वर्णन करीत होती. त्या वर्णनानें नव्हे तर शेपटी वर करून आपलें मऊ अंग तिच्या पोटरीशीं घांसणाऱ्या तिच्या मांजरीच्या आल्हादकारक स्पर्शानें मालकिणीच्या चेहऱ्यावर मधुर समाधानाच्या स्मिताची झांक आली होती. सगळे पेले भरल्यावर तिनें ते जवळ पांढऱ्याशुभ्र पोषाखांत अदबीनें उभा असलेल्या आपल्या नोकराजवळ दिले आणि सर्व मंडळींनीं आपआपले पेले उचलून मद्यप्राशनाला सुरवात केली. इतक्यांत बाहेर बुटाचीं पावलें वाजलीं आणि मालकीण उठून म्हणाली—

" डॉ. व्हॉन्स्की आणि त्यांची मुलगी असावींत बहुतेक."

तिचा तर्क खरा ठरला आणि दोन क्षणांत आपल्या मुलीला पुढें घालून दारांतल्या पायतणावर बूट पुशीत डॉ. व्हॉन्स्की आपल्या मुलीच्या थिल्लर गतीला विरोधानें प्रकर्षित करीत, शिथिल गतीनें त्या दिवाणखान्यांत शिरले. घराच्या मालकिणीनें शिष्टाचाराप्रमाणें त्यांचा आणि अगोदर जमलेल्या मंडळींचा परिचय करून दिल्यावर डॉ० व्हॉन्स्की एका खुर्चीवर बसले आणि त्यांची मुलगी मिसेस रिक्‌फर्ड आणि आयरिश पत्रविशारद यांच्याजवळ कोचावर बसली.

डॉ. व्हॉन्स्की वयस्क, मध्यम उंचीचे आणि शरीरानें स्थूल होते. त्यांची पांढरीशुभ्र दाढी, दाट पांढऱ्या भुंवया आणि भरघोंस पांढऱ्या मिशा यांनीं एक प्रकारचा भारदस्तपणाचा परिणाम त्यांना भेटणाऱ्यांच्या मनावर होई. वयाच्या मानानें त्यांचे केंस जरा जास्त पांढरे झाले होते. त्यामुळें भारदस्तपणाबरोबरच एका गंभीर आणि उदात्त कारुण्याची जाणीव त्यांना बघितलं म्हणजे होई. आणि त्यांच्या स्थूल शरीरानें व शांत, सजल डोळयांनीं त्या जाणिवेला दुजोरा मिळे. अंगांत एक सामान्य कपड्याचा सूट, पायांत लठ्ठ बूट, आणि तोंडावर सतत हास्य ! धंद्यांत हुशार आणि वागणुकींत समजूतदार; डॉ. व्हॉन्स्की कलकत्त्यांतल्या एका फौजी हॉस्पिटलचे आधारस्तंभ होते. मिस् व्हॉन्स्की गोड मुलगी होती आणि डॉ. व्हॉन्स्कींचा विरंगुळा होती.

जमलेल्या मंडळींच्या चालू असलेल्या संभाषणांत डॉ. व्हॉन्स्की आल्यानें थोडा खंड पडला. शिष्टोचित परिचयसमारंभानंतर

घराच्या मालकिणीनें प्रथम मिस् व्ह्रॉन्स्कीला आणि नंतर डॉ. व्ह्रॉन्स्कींना काय पिणार म्हणून विचारलं—

" काय घेणार तुम्ही ?"

" लहान गिमुलेट, कृपा करून. जिन् थोडी अं. " मिस् व्ह्रॉन्स्कीनें सांगितलं.

" आणि आपल्याला काय देऊं ? पेग ? "

" होय, कल्पना कांहीं वाईट नाहीं ! " डॉ. व्ह्रॉन्स्कींनीं घराच्या मालकानें पुढें केलेली सिगारेट घेत उत्तर दिलं.

" एक लहान गिमुलेट, थोड्या जिन्चं, आणि एक पेग ? " घराच्या मालकिणीनें परत उजळणी केली व ती कोपऱ्यांतल्या मद्याच्या टेबलाजवळ मद्य भरण्याकरितां गेली.

" नोकर, थोडं बर्फ आण. " अशी नोकराला आज्ञा करून मालकिणीनें जमलेल्या मंडळीकडे मान वळवून म्हटलं, " मिस् व्ह्रॉन्स्कीला मद्य फार चांगल्या रीतीनें आणि निरनिराळ्या पद्धतींनीं मिसळण्याची कला अवगत आहे बरं कां. परवांच तिनें मला मद्य मिसळण्याची एक नवीन तऱ्हा सांगितली आहे. मी एकदां प्रयत्न करून पाहणार आहें. "

" कुठली तऱ्हा ती ? " मिसेस रिकूफर्डनें मिस् व्ह्रॉन्स्कीला शिष्टोचित आणि सभ्य उत्सुकतेनें विचारलं.

" पाणी, शेरी, शुद्ध मद्य, आणि..."

" हो, पण लांकडाच्या पिपांत घालून तें मिश्रण सात वर्षें मुरूं दिलं पाहिजे ! " घराची मालकीण म्हणाली.

" मुरलं नाहीं तरी तें मिश्रणसुद्धां कांहीं वाईट नाहीं लागत तसंच," मिस् व्हॉन्स्की म्हणाली. " अर्थात् पूर्ण लज्जत नाहीं चाखतां येत मुरलं नाहीं तर. माझी आई या बाबतींत फार प्रवीण होती. नाहीं कां बाबा?"

" होय. पण मला स्वतःला मिसळलेल्या मद्यांची फारशी चव नाहीं," डॉ० व्हॉन्स्कींनीं संथपणें आपली आवड सांगितली.

" वाः छान, म्हणजे आपली आणि आमच्या पतिराजांची आवड एकच आहे म्हणायची! मग तुमचं आणि त्यांचं चांगलंच जुळेल कीं!" घराची मालकीण विनोदी स्मितानें उद्गारली. " यांनासुद्धां स्वच्छ आणि शुद्ध व्हिस्की आणि सोडा हवा. दुसरं कांहीं नको!"

" होय बुवा, आपल्याला त्याच्यासारखी इतर कुठल्याही पेयाची लज्जत नाहीं," तिच्या पतिराजांनीं कबुलीजबाब दिला.

दोन हातांत दोन मद्याचे पेले घेऊन मालकिणीनें ते डॉ. व्हॉन्स्की व मिस् व्हॉन्स्कींना दिल्यावर सगळ्यांनीं आपआपले पेले वर उचलून ओठांला लावले. आपला पेला खालीं ठेवीत आयरिश वृत्तपत्रविशारद म्हणाला—

" हल्लीं मद्याचा भाव काय वाढला आहे! काल मी एक व्हिस्कीची बाटली आणवली तर काय अवाच्या सवा दाम!"

" तितका दाम देऊन तरी मिळाली हें भाग्य!" मिसेस रिक्फर्ड म्हणाली. " हल्लीं मद्य मिळणंच कठीण झालं आहे. आपले हे सैनिक स्वदेश सोडून इतक्या लांब येतात त्यांना साधं मद्य, बीअरसुद्धां

कधीं कधीं योग्य किंमतींत मिळत नाहीं बिचाऱ्यांना. आणि त्यांना ठराविक पगारांत सगळं भागवायचं असतं. जरा कठीणच नाहीं कां?"

"सैनिकांपेक्षांही बोटीवरच्या नाविकांची स्थिति विचित्र! ते बिचारे सातां समुद्रावरून जीव धोक्यांत घालून मद्याच्या पेट्या इथंपर्यंत आणतात आणि त्यांनाच कधीं कधीं मद्य मिळत नाहीं म्हणे!" घराची मालकीण सहानुभूतीच्या स्वरांत म्हणाली.

"इथं नुसतं मद्यच मिळायला क्वचित् पंचाइत पडते; पण आघाडीवर लढणाऱ्या आपल्या सैनिकांना साधी सिगरेटसुद्धां मिळत नाहीं कित्येक वेळा, त्याचं काय?" आयरिश वृत्तपत्रविशारदानें कांहींशा स्वानुभवाच्या आवाजांत दुजोरा दिला.

"होय खरंच. आपल्या आघाडीवरच्या छोकऱ्यांची अधिक काळजी घ्यायला पाहिजे. काय उमदे लोक आहेत ते! मी इथल्या एका फौजी हॉस्पिटलमध्यें जात असतें. जखमी झालेल्या अधिकाऱ्यांचं हॉस्पिटल आहे तें. मला कामांतून कसला वेळ मिळतो म्हणा! पण त्यांतल्या त्यांत वेळ काढून जातें मी विचारपूस करायला. म्हटलं, एवढं आपलं रक्त देशाकरितां खुषीनें द्यायला तयार झालेले हे लोक बिचारे आपला देश सोडून इतक्या लांब इथं आलेले. त्यांना घराची किति आठवण होत असेल! माझीच गोष्ट पहा ना. या वर्षी आम्हांला घरीं जातां आलं नाहीं तर मला कशी हुरहुर लागली आहे! यापूर्वी आम्ही गेल्याला दोन तीन वर्षे झालीं. ऑक्लंडला सुटी काढली आम्ही तेव्हां. इतकीं लहान लहान गोजिरवाणीं शाळेंत जाणारीं मुलं होतीं आमच्या आसपास! त्यांतला एक मुलगा फार हुशार

होता आणि हिंदुस्थानच्या राज्यघटनेबद्दलसुद्धां त्यानें मला किती प्रश्न विचारलेन् पण! म्हणून सांगत होतें काय कीं आपल्या जखमी झालेल्या लोकांनासुद्धां घरची अशीच हुरहुर लागत असेल. तेव्हां फार नाहीं तरी मधून मधून जरा विचारपूस केली तर तेवढंच त्यांना बरं वाटायचं. माझी त्यातल्या कांहीं लोकांशीं चांगली ओळख झाली आहे आतां. त्यांतला एक मनुष्य माझा विशेष आवडता आहे. लंडनच्या स्कॉटलंड यार्डमध्यें होता तो. नंतर सैन्यांत शिरला. तो सांगत होता कीं इथं आला तेव्हां अंगावरचं शर्ट बदलायलासुद्धां दुसरं शर्ट नव्हतं त्याला! खरं म्हटलं तर जखमी होऊन आलेल्यांना द्यायला सामान्यतः साबण, ब्रश, वस्तरा, आणि एक कपड्यांचा सूट अशीं पार्सलं तयार ठेवलेलीं आहेत लोकांनीं. पण आपला कारभार असा कीं जिनसा असून बिचाऱ्यांना वेळेवर किंवा नीटपणें मिळण्याची सोय नाहीं. वाटेल तितकीं पार्सलं आहेत पण मागणी आणि पुरवठा यांचा मेळ असेल तर ना! शेवटीं, मीं त्याला कांहीं कांहीं वस्तू दिल्या. त्यांची मुख्य अडचण म्हणजे करमणुकीची. हा माझा खुद्द जो दत्तकसा आजारी गृहस्थ आहे त्याला वाचण्याचा नाद आहे. जुनीं मासिकं वगैरे त्यांना पाठवितां येतील तितकीं हवींच आहेत."

"हो कां? आपल्याकडे कांहीं जुने अंक आहेत ते पाठवून दे हवे असतील तर," घराचा मालक आपल्या पत्नीला उद्देशून मध्येंच म्हणाला. पत्नीनें उत्तर दिलं—

"जरूर, जरूर."

मिसेस् रिकूफर्डनें कृतज्ञतापूर्वक त्यांच्या देणगीच्या आश्वासनाचा स्वीकार केला. आणि पुन्हां सुरवात केली.

" खरोखर, मोठं कंटाळवाणं वाटतं त्यांना हॉस्पिटलमध्यें. जरा आपल्यासारखं बाहेरचं कुणी गेलं विचारपूस करायला म्हणजे तेवढंच बरं वाटतं त्यांना. हल्लीं मी त्यांतल्या कांहीं लोकांना घरीं बोलावीत असते मधून मधून. लहानशी पार्टी म्हणा किंवा सकाळीं टेनिस वगैरे खेळायला म्हणा. मिसेस् पामर आणि मिस् कर्टिन आणि मिसेस् शार्प यांनींसुद्धां इथं आलेल्या जखमी नि इतर सैनिकांची करमणूक करायचं कबूल केलं आहे. तुम्ही या कीं एकदां माझ्याबरोबर मी जात्यें त्या हॉस्पिटलमध्यें," मिसेस् रिकूफर्डनें घराच्या मालकिणीला उद्देशून म्हटलं.

" हो, खरंच मला एकदां अवश्य यायचं आहे." घराच्या मालकिणीनें उत्तर दिलं.

" मग केव्हां येणार तें सांगा."

" हे डॉ० व्हॉन्स्कीही एका फौजी हॉस्पिटलमध्यें आहेत. त्यांनींही त्यांच्या हॉस्पिटलमध्यें बोलावलं आहे एकदां. दोन्हीकडे जायचं आहे मला नक्की आणि लवकरच."

" होय, तुम्हीसुद्धां बाबांच्या शस्त्रक्रियेच्या खोलींत जाऊन त्यांचं कौशल्य खरोखरच बघा एकदां." मिस् व्हॉन्स्की मिसेस् रिकूफर्डकडे पाहात म्हणाली.

" हं," मिसेस् रिकूफर्डनें किंचित् थंडावलेल्या उत्साहानें उत्तर दिलं.

चतुर सभ्यतेनें घराच्या मालकिणीनें त्या क्षणाला मंडळींच्या मद्यांच्या पेल्यांकडे नजर टाकीत कुणाला आणखी आणि कोणतं पेय पाहिजे हें विचारलं आणि मद्यप्राशनचा दुसरा हप्ता सुरू झाला. घराची मालकीण मद्य भरीत असतां मिस् व्हॉन्स्की उठली आणि तिला मदत करायला म्हणून गेली. त्या निमित्तानें प्रत्येकजण जरासा उठला आणि इकडे तिकडे फिरला. मद्याचा दुसरा हप्ता सुरू होणार इतक्यांत वरून संध्याकाळची आकाशी गस्त घालणारं एक विमान घर्रर्र घर्रर्र आवाज करीत गेलं. प्रत्येक व्यक्तीचे डोळे क्षणैक एकसमयावच्छेदेंकरून आपोआप दिवाणखान्याच्या खिडक्या बाहेर बघूं लागले. त्यानंतर मंडळी पूर्वीप्रमाणें एकत्र न बसतां त्यांचे दोन गट पडले. एकीकडे घराचा मालक आणि आयरिश वृत्तपत्रविशारद मिस् व्हॉन्स्कीशीं गप्पा मारीत होते; दुसरीकडे मिसेस रिकूफर्ड, भाई कुमार आणि घराची मालकीण डॉ. व्हॉन्स्की-सभोंवती मंडळ करून बसले होते. बोलत होती ती मिसेस रिकूफर्ड प्रथम —

"बाकी आपले आर्. ए. एफ्. चे लोक काय धडाडीचे आहेत नाहीं! मला वाटतं या युद्धाचं भवितव्य अखेर वैमानिक आघाडीवर ठरणार. तुम्हांला नाहीं तसं वाटत?"

"मला तर वाटतं कीं मुख्य आघाडी नाविक दलाची आहे," घराची मालकीण म्हणाली. "आपली जहाजांची संख्या आणि नाविक सामर्थ्य हीं शाबूत राहिलीं तर विजय थोडासा लांबला तरी शेवटीं आपलाच होईल यांत तिळमात्र शंका नाहीं. पॅसिफिक महासागरांत काय, अटलांटिक महासागरांत काय किंवा

भूमध्यसमुद्रांत काय, आपलं नाविक वर्चस्व टिकलं पाहिजे आणि अभेद्य झालं पाहिजे. युद्धसामग्री, सैन्य वगैरे रणांगणावर उपयोगी पडणारं साहित्य, त्याचप्रमाणें उदरनिर्वाहाला आवश्यक अशा जिनसा यांची वहातुक अखंड राखली गेली पाहिजे. त्या जहाजांचं संरक्षण करणारीं लढाऊ जहाजं आणि खुद्द समुद्रावर लढाई करणारं आरमार इतकं असल्यावर जर्मनी काय किंवा जपान काय, नामोहरम झालाच पाहिजे. आणि आपले आरमारी, नाविक लोक शूर आहेत खरेच ! अफाट समुद्रावर शत्रूशीं सामना द्यायला काहीं निराळंच धैर्य लागतं ! "

" तें खरं. पण आरमारी युद्धांतसुद्धां हल्लीं विमानांचं फार मोठं स्थान आहे हें नाकबूल करतां येणार नाहीं. शिवाय आर्.ए. एफ्.चीं विमानं जर्मनीवर सतत हल्ले करून तिला कसं जेरीस आणताहेत हल्लीं पहा. त्यामुळें पूर्वेकडे रशियाला अप्रत्यक्षपणें केवढी मोठी मदत होत आहे ! " मिसेस् रिक्फर्ड म्हणाली.

" बाकी रशियनांचं शौर्य मात्र अलोट यांत शंका नाहीं," भाई कुमार म्हणाले. " काय मर्दुमकीनें हिटलरच्या अजस्र सैन्याला त्यांनीं तोंड दिलं आहे पण ! सगळं जग आज त्यांच्याकडे, त्यांच्या बेगुमान शौर्याकडे विस्मयचकित होऊन पाहात आहे. आणि त्यामुळें एकंदर संयुक्त राष्ट्रांच्या फळीला केवढी अलभ्य चिकाटी लाभली आहे ! रशियांतला प्रत्येक मनुष्य हें आपलं युद्ध म्हणून निकरानें लढत आहे. आणि त्याचं कारण म्हणजे रशियांत झालेली क्रांति. समाजसत्तावादाचं वातावरणच असं असतं कीं प्रत्येक मनुष्याला

सबंध देश स्वतःच्या घराप्रमाणें वाटावा. त्यांत भेदभावाला जागा नसते. त्यामुळें मनुष्याला एक अद्वितीय स्फूर्ति आणि नैतिक जाज्वल्यता प्राप्त होते. जागतिक मजुरांच्या बंधुत्वाची प्रेरणा आज जगाच्या स्वातंत्र्याकरितां आणि हुकूमशाही राक्षसांच्या निर्दलनाकरितां रशियनांना स्टालिनच्या निशाणाखालीं अहमहमिकेनें, जिवावर उदार होऊन लढायला लावीत आहे हेंच खरं रहस्य आहे त्यांच्या रणांगणावरील पराक्रमाचं. काय, खरं कीं नाहीं, डॉ. व्हॉन्स्की ?"

"रशिअन लोक नेहमींच शूर म्हणून प्रसिद्ध आहेत." डॉ. व्हॉन्स्की उत्तरले.

"अलबत्, अलबत्, पण त्या शौर्याचा प्रकर्ष ऑक्टोबरच्या क्रांतीनें झाला नाहीं कां ?..."

भाई कुमारांचं भाषण चालू होतं. पण त्यानंतर डॉ. व्हॉन्स्की जरी बाह्यतः तें लक्षपूर्वक ऐकत होते आणि योग्य ठिकाणीं शिष्टाचाराला उचित अशीं उत्तरें देत होते तरी त्यांचं मन निराळ्याच व्यवधानांत गुंतलं होतं. ऑक्टोबरच्या क्रांतीचा उल्लेख होतांच त्यांची दृष्टि दुसरीकडे बसलेल्या आपल्या मुलीकडे क्षणभरच आपोआप वळली. तिच्या आईनें, डॉ. व्हॉन्स्कीच्या पत्नीनें, डॉ. व्हॉन्स्कीबरोबर त्या क्रांतींत भाग घेतला होता. जागतिक समता आणि बंधुवाद, सामुदायिक शेती, वर्गभेदाचं निराकरण, सार्वत्रिक शिक्षण, आर्थिक विषमतेला मूठमाती, प्रत्येकाला त्याच्या गरजेप्रमाणें आणि प्रत्येकाकडून त्याच्या शक्तीप्रमाणें; क्रांतीचा उत्साह दुर्दम्य कीं पृथ्वीवर स्वर्ग येईल. डॉ० व्हॉन्स्कींनीं आणि मिसेस् व्हॉन्स्कींनीं रंगविलेलीं भविष्याचीं रम्य चित्रें ! नंतर गांवच्या गटांशीं मतभेद,

अवहेलना, गुप्त पोलिसांचा ससेमिरा, सहकाऱ्यांना क्रूर शिक्षा, छळ! शेवटीं, त्या सर्व प्रकारांत अचानकपणें मिसेस् व्हॉन्स्कींचा अंत. मुलीला घेऊन देशाचा निरोप—आणि आज रशियनांचा हिटलरच्या-विरुद्ध अलोट प्रतिकार; आपण इथं कलकत्त्यांत फौजी हॉस्पिटलांत; आपली मातृविहीन समोर बसलेली मुलगी; तें समोरचं भिंतीवर टांगलेलं चित्र; त्या कोचावर पडलेली सिगारेटची राख; मिसेस् रिकूफर्डची केशरचना; भाई कुमारांचे कान;...कुठं आहोंत आपण...कानांवर कांहीं तरी शब्द पडत होते...भाई कुमारांचे...

"...पण सध्यां तर लढाई आहे तेव्हां जाणं अशक्य. शिवाय पैसा लागतो जायला!" डॉ० व्हॉन्स्कींनीं जवळच्या मद्याच्या पेल्यांतून एक घोंट घेतला आणि ते भाई कुमारांना म्हणाले—

"माफ करा हं, जरा खासगी प्रश्न विचारतों. पण आपल्याला पगार किती आहे?"

"साधारण हजार..."

"मग हें बघा, मि. कुमार, रशियाला लढाईनंतर जा वाटल्यास; पण उद्यां माझ्याबरोबर आमच्या हॉस्पिटलमध्यें जरूर या. आणि तुम्हांला सवड झालीच तर तुम्ही पण या." डॉ० व्हॉन्स्की मिसेस् रिकूफर्डला उद्देशून म्हणाले आणि त्यांनीं आपल्या मुलीसह जमलेल्या मंडळींचा निरोप घेतला व घराच्या मालक मालकिणींचे आभार मानले.

—✱—

# १४. हॉस्पिटलांत

"वो लिखितेब्राई आयी है ?"

एका फौजी हॉस्पिटलमधल्या रुग्णशय्येवरून शिवाचा तोच आवाज पुन्हां ऐकूं आला. पण त्यांत आतां जास्त हुशारी होती. कारण डॉ. व्हॉन्स्कींच्या प्रयत्नांना यश आलं होतं आणि शिवा आतां हॉस्पिटलमध्यें हिंडूं फिरूं लागला होता. शिवा डॉ. व्हॉन्स्कींचा "स्पेशल पेशंट" होता! त्याच्या कोपरावरचं मांस आतां भरून आलं होतं आणि कोपराचा सांधाही बसवला गेला होता. अजून जरी तो स्लिंगमध्यें हात ठेवीत होता तरी किंचित् अशक्तपणाशिवाय त्याच्या हाताला कांहीं होत नव्हतं. त्याच्या इतर जखमाही भरून आल्या होत्या. प्रथमतः शिवा हॉस्पिटलमध्यें आला तेव्हां त्याच्या कोपराची जखम पाहून डॉ. व्हॉन्स्कींनीं त्याच्याकडे अधिक लक्ष पुरविलं होतं. आणि म्हणून हॉस्पिटलमध्यें तो डॉ. व्हॉन्स्कींचा आवडता पेशंट म्हणून (कारण पेशंटचं दुखणं जितकं अधिक कष्टसाध्य किंवा 'केस' जितकी अधिक कठीण तितकी डॉक्टरांची त्यावर अधिक कृपादृष्टि!) किंवा 'स्पेशल पेशंट' म्हणून प्रसिद्ध होता. त्या सकाळीं त्यानें वरील प्रश्न विचारला तो जवळून जाणाऱ्या एका शुभ्र पोषाख केलेल्या परिचारिकेला.

त्या सबंध हॉस्पिटलमध्यें आजारी सैनिकांना जर कुणी अत्यंत आवडत असेल तर ती परिचारिका आणि सुलभा. ती परिचारिका वास्तविक एका मोठ्या पगाराच्या इंग्लिश मनुष्याची बायको होती. पण मिसेस् रॉबिन्सन्ला आपण इंग्लिश आहोंत ही जाणीव तरी होती कीं नाहीं याची शंकाच आहे. हॉस्पिटलमध्यें जात, धर्म, वर्ण वगैरे पूर्णपणें विसरून जाऊन निरलसपणें सेविकेचं काम करणाऱ्या मिसेस रॉबिन्सन्नें तेथील सर्व आजारी सैनिकांचीं अंतःकरणं आपल्या ममताळूपणानें, स्मित भाषणानें कायमचीं जिंकून टाकलीं होतीं. हॉस्पिटलमधलं भिन्नवर्णीय सैनिकांचं कसलंही काम तत्परतेनें करणारी ती श्रीमंत इंग्लिश मनुष्याची बायको म्हणजे मानवी सेवाधर्माची मूर्तिमंत प्रतिमा होती. निरनिराळ्या रंगांच्या पातळांत थिल्लरपणें शौक म्हणून हॉस्पिटलमध्यें चार दोन दिवस मानवसेवेचा दिमाख दाखवून अचानक अदृश्य होणाऱ्या स्वदेशीय हौशी परिचारिकांचा परिचय असलेल्या त्या आजारी सैनिकांना मिसेस् रॉबिन्सन्बद्दल किती प्रेम, आदर आणि कृतज्ञता वाटत असेल याची कल्पनाच केलेली बरी. पुढें बांबूची टोपली बांधलेल्या सायकलवरून हॉस्पिटलच्या आवारांत येणारी मिसेस् रॉबिन्सन् रोज आनंदाची आणि समाधानाची झुळुक आणणाऱ्या वायुदेवतेप्रमाणें होती. कुणाचं जरा कांहीं दुखलं, कुणाचं अंग गरम ओल्या फडक्यानें पुसायचं असलं, कुणाची चादर बदलायची असली, तरी प्रत्येक आजारी सनिकाची हांक मिसेस् रॉबिन्सन्ला किंवा सुलभेला जायची. आणि त्या हांकेला त्या

दोघींपैकीं एकीचं तरी उत्तर आलं नाहीं असं क्वचित्‌च झालं असेल. त्या नियमाप्रमाणें शिवाच्या हांकेलाही उत्तर आलं—

"वो लिकिटेबाई आज जरा डेरसे आयेंगी." शिवाच्या मराठी हिंदुस्थानीला मिसेस् रॉबिन्सन्‌च्या इंग्रजी हिंदुस्थानींतून उत्तर आलं. तिनें आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्याच्या कॉटजवळ येऊन सहानुभूतीनें विचारपूस केली.

"टुमकू आज कैसा लगूटा हैं ? अच्छा ? और क्या मंगटा है टुमकू ?" मिसेस् रॉबिन्सन्‌चं हिंदुस्थानी कसंही असलं तरी तिच्या शब्दांच्या मागें असलेली हार्दिक भावना रुग्णशय्येवरील प्रत्येक मनुष्याला आनंद देई. "टुमकू जलडी घर जानेकू मंगटा है ?" तिनें स्मितपूर्वक प्रश्न केला.

पण शिवा त्या क्षणाला उत्सुक झाला होता तो सुलभेकरितां. कारण थोड्याच वेळांपूर्वी त्याच्या हातांत कोंडीबाचं पत्र पडलं होतं आणि त्याला तें कुणीतरी वाचून दाखवायला हवं होतं. त्याच्या शेजारच्या पंजाबी मित्राला उर्दू वाचतां येत होतं पण मराठी वाचायला हॉस्पिटलमध्यें फक्त एक सुलभाच होती. आणि आजच तिला यायला उशीर व्हावा हें पाहून शिवाचा थोडा विरस झाला होता. कोंडीबाची आणि सारजाची बातमी ! त्यांतल्या त्यांत समाधान म्हणून त्यानें कोंडीबाचं पोस्टकार्ड मिसेस् रॉबिन्सन्‌ला नुसतं दाखविलं आणि स्वतः एकदां हतबुद्धतेनें बघितलं. मिसेस् रॉबिन्सन्‌नें तें मराठींत लिहिलेलं आहे असं पाहातांच आपल्या सदैव हंसऱ्या चेहऱ्यावर असहायतेचा आविर्भाव दाखवून म्हटलं—

" अच्छा, लिकिटबाई आयेंगी टब् अम् उसूकू टुमारे टरफ भेज डेएंगे."

तेवढ्या आश्वासनापलीकडे तिला कांहीं करतां येणं शक्य नव्हतं. तेव्हां तें आपल्या गोड शब्दांत देऊन मिसेस् रॉबिन्सनू आपल्या कामाला गेली आणि शिवा तसाच सुलभेची वाट पाहात बसला. शेवटीं, कोंडीबाच्या पत्रांतला मजकूर त्याला कळला तो सुलभेकडून नाहीं, तर भाई कुमारांकडून.

डॉ० व्हॉन्स्कींनीं दिलेलं आमंत्रण कुमारांनीं स्वीकारलं होतं आणि ठरल्याप्रमाणें सकाळीं दहा वाजतां भाई कुमारांची मोटार त्या फौजी हॉस्पिटलच्या पोर्चमध्यें दाखल झाली. दारावरच्या शिपायाला त्यांनीं डॉ० व्हॉन्स्की कुठं आहेत म्हणून विचारलं आणि त्याने दाखविलेल्या मार्गानें ते डॉ० व्हॉन्स्कींच्या खोलींत आले. पण डॉ० व्हॉन्स्की आपल्या खोलींत नव्हते. एका महत्त्वाच्या शस्त्रक्रियेंत ते गुंतले होते. कुमार त्यांच्या खोलींतच वाट पाहात बसले. आजूबाजूच्या वार्डांमधून हॉस्पिटलमध्यें दरवळणारा निरनिराळ्या औषधींचा वगैरे संमिश्र वास येत होता. हॉस्पिटलच्या शुभ्र पोषाखांतील लोक पायांचा आवाज कमी होईल अशा बुटांत इकडून तिकडे कामानिमित्त येत जात होते. आणि त्यांच्याकडे भाई कुमार कुतूहलानें पाहात होते. आपणही परदेशाला वैद्यकीय शिक्षणाकरितांच गेलों होतों. तें शिक्षण जर आपण पुरं केलं असतं तर आज आपल्यालाही या इमारतींत किंवा यांसारख्या इमारतींत कांहींतरी कार्य करतां आलं असतं. कदाचित् युद्धांतल्या रणक्षेत्रावरच्या एकाद्या मेडिकल युनिटमध्यें किंवा वैद्यकीय गटाच्या नोकरींत

दाखल होतां आलं असतं. पण झाली गोष्ट गेली. आपल्या कुवती-प्रमाणें सध्यां आपण काम करतोंच आहोंत. कदाचित्......

बाहेर हॉस्पिटलच्या आवारात पिंवळीं आणि तांबडीं फुलं फुललीं आहेत–समोरच्या निळया, पिवळसर किंवा पिंगट, पांढऱ्या बाटल्यांवरच्या चिठ्ठया वाचल्या तर आपल्याला अगदींच दुर्बोध वाटणार नाहींत त्या—आमोनिआ–माहीत आहे—बायकार्बनेट ऑफ् सोडा–कॅल्शिअम्–या चिठ्ठया आपल्याला समजतात. पण दुसरं कांहीं तरी समजत नाहीं खास इथें. काय बरं आहे तें?—

पण डॉ. व्हॉन्स्की इतक्यांत आंत आले आणि कुमारांच्या कल्पनांची सांखळी तुटली.

" नमस्कार, मिस्टर कुमार, नमस्कार. "

" नमस्कार. "

" क्षमा करा अं. जरा हात धुतों. तुम्हांला फार वेळ तिष्ठत ठेवलं नाहीं? दिलगीर आहे. "

" नाहीं नाहीं, फार वेळ मुळींच नाहीं. "

" अच्छा, आतां नाहीं जास्त वेळ लावीत. खरोखर तुम्ही सवड काढून आलांत यानें किती आनंद होतो आहे मला. " असं म्हणून डॉ. व्हॉन्स्कींनीं कुमारांना बरोबर घेतलं आणि जखमी सैनिकांच्या वॉर्डांमधून त्यांना फिरवलं.

" आमच्याकडे अजून पुरेशा कॉट्स् नाहींत. उद्यां आणखी कांहीं लोक येणार आहेत. त्यामुळें जे बहुतेक पूर्णपणें बरे झाले आहेत त्यांना दुसरीकडे पाठवून देण्याची किंवा घरीं धाडण्याची व्यवस्था करावी लागणार आहे. "

" डॉ० व्हॉन्स्की, खरोखर तुमचा धंदा किती उदात्त आहे!"

" छे, छे, मुळींच नाहीं. धंदा म्हटला कीं धंदा. त्यांत उदात्त बिदात्त कांहीं नाहीं! तुम्ही लेखणी चालवतां, मी शस्त्रक्रिया करतों. दोन्हीही धंदेच. पोटाकरितां प्रामाणिकपणें आचरायचे! बस्स."

" तरी पण दुसऱ्याचं शारीरिक दुःख नाहींसं करायचं! क्वचित् वेळां जीवदानही..."

" तो नशिबाचा भाग. मी फक्त माझ्या शिकलेल्या विद्येचा उपयोग करतों...या वॉर्डांतले हे सगळे सामान्य जखमांचे लोक आहेत. कुठं कांटा मोडून पूं झालेला, कुठं एवढी तेवढी जखम झालेली."

" हंऽ."

" पुढचा वार्ड जरा जास्त गंभीर स्वरूपांच्या जखमा झालेल्या लोकांचा. हा पहा, हा एक शूर पठाण आहे. त्याचा डावा पाय गुडघ्याखालीं कापून काढावा लागला. पण आतां तो खास बरा होणार."

" आप पठाण हों? कहांसे आये?" कुमारांनीं विचारलं.

" हां साब, पीशावरसे."

" ठीक है अभी?"

" हां साब."

" आणि हा एक शूर शीख आहे. त्याच्या दंडांतून गोळया काढाव्या लागल्या."

" कैसे हो आप?"

" ठीक है साब."

"घरका खत बीत आतां है ?"

"हां साब, आया था एक."

"आणि हा एक मद्रासकडचा सैनिक आहे. पण त्याला हिंदुस्थानी समजत नाहीं. सर्व खुणांनीं काम!"

निरनिराळे हातवारे आणि आविर्भाव करून कुमारांनीं त्याचं कुशल विचारलं. तो प्रकार चालू असतां हॉस्पिटलच्या त्या वातावरणांतही विनोदाची एक लहर उमटून गेली.

"आणि हा एक शूर मराठा आहे. माझा स्पेशल पेशंट. तुम्हीही मराठेच आहांत नाहीं? मग त्याच्याशीं जरा मराठींत बोलूं शकाल?"

"नमस्कार. काय नांव तुमचं?" भाई कुमारांनीं विचारलं.

"शिवा, शिवा कोंडीबा." शिवानें उत्तर दिलं. प्रचंड जनसमुदायांत एकदां लांबून बघितलेलं त्यानें भाई कुमारांना. शिवाय, त्याचा पोषाख बदललेला. अर्थात् शिवाला आपण कुणाशीं बोलतों आहोंत याची ओळख पटणं संभवनीय नव्हतं.

"कुठले तुम्ही?"

"पळसखेड्याचा."

"असं कां. काय ठीक आहे? घरची खुशाली वगैरे कळते कां?"

"व्हय," शिवानें उत्सुकतेनें म्हटलं. "चिटी आली हाय आजच पन् वाचाया नई गांवलं कुनी." आणि त्यानें पुन्हां कोंडीबाचं पोस्टकार्ड एकदां प्रेमानें हाताळलं. हे समोर उभे असलेले गृहस्थ वाचून दाखवतील तर काय छान होईल!

" कुठं आहे बघूं पत्र ? मी दाखवूं कां वाचून ? "

" लइ किरपा व्हइल जी. " असं म्हणून शिवानें तें कार्ड कुमारांच्या हातांत दिलं आणि तो एक प्रकारच्या केविलवाण्या आतुरतेनें त्यांच्याकडे बघूं लागला.

कुमारांनीं तें कार्ड हातांत घेतलं आणि त्यांतला मजकूर त्यांनीं शिवाला वाचून दाखविला. पहिलं वाक्य औपचारिक होतं. त्यानंतर शिवाला बातमी कळली प्रथम कीं ' सारजाला कुणीतरी जिल्ह्याच्या गांवच्या रस्त्यावरून पळवून नेलं. अजून तिचा पत्ता नाहीं. पोलिसांना वर्दी दिली आहे आणि तपास चालू आहे. तुला कांहीं करतां आलं तर बघ. '

ती बातमी ऐकतांच शिवाच्या मनावर विलक्षण अनपेक्षित आघात झाला. कोंडीबा पळसखेडं सोडून जिल्ह्याच्या गांवीं एका कारखान्यांत नोकरी करीत होता याची त्याला कल्पनाहि नव्हती. ती बातमी त्याला अजूनही कळली नव्हती, कारण आपल्या मुलाला निष्कारण काळजी लागूं नये म्हणून कोंडीबानें त्याला ती बातमी कळविली नव्हती. आणि दुसऱ्याकडून पत्र लिहिवून घेतांना तो मुद्दाम सांगत असे, कीं पत्रावर पळसखेडं लिहा म्हणून. त्यामुळें सारजा एकाकी कशी सापडली आणि कुठं सांपडली आणि कशी पळविली गेली याचा त्याला कांहींच अंदाज करतां येईना. आणि हॉस्पिटलमधल्या त्या रुग्णशय्येवरून त्याला करतां तरी काय येणार! त्याचं मन आपल्या हतबल स्थितीनें अगदीं कावरंबावरं झालं. 'वैरी न चिंती तें मन चिंती' आणि शिवाचं मनोधैर्य कितीही असलं तरी असल्या परिस्थितींत त्याच्या कल्पनांनीं त्या मनोधैर्याचा पाया

डळमळीत केला. त्याला वाटलं इतकीं विमानं रोज इथं वर फिरतात आकाशांत, त्यांतल्या एकांत बसून जर या क्षणाला पळसखेड्याला जातां आलं असतं तर किती बरं झालं असतं !

असल्या विकल मनःस्थितींत शिवा असतांनाच सुलभा त्याच्या जवळ आली, आणि त्याला म्हणाली—

" काय शिवा, काय पाहिजे तुला ? रॉबिन्सन्बाईनीं मी आल्याबरोबर मला तुझ्याकडे यायला सांगितलं, " असं ती म्हणते तोंच तिची दृष्टि शिवाच्या चेहेऱ्यावर खिळली. तो चेहेरा अगदीं गोरामोरा झाला होता !

" शिवा, बरं नाहीं वाटत कां तुला ? कां घरची आठवण आली ? आतां लवकरच तूं जाशील घरीं. "

प्रेमळ सहानुभूतीची अपेक्षा सुलभा कधींच विफल होऊं देणार नाहीं अशी शिवाची पूर्ण खात्री होती. स्वतःच्या आयुष्यांत आलेल्या दुःखद अनुभवानें सुलभेचं अंतःकरण अत्यंत कोंवळं झालं होतं. अभिजात कोमलता आणि सुसंस्कृत विलासीपणा यांचं कमनीय मिश्रण असलेली पूर्वीची सुलभा आतां अभिजात कोमलता आणि सुसंस्कृत वत्सलता यांचं उदात्त मिश्रण बनली होती. शिवाय, आपल्या हृदयांतली कालवाकालव मातृभाषेंत यथार्थतेनें जर शिवाला कुणाच्या पुढ्यात संकोच न धरितां त्या ठिकाणीं व्यक्त करतां आली असती तर ती फक्त एका सुलभेच्या !

" ह्यो चिटी आली हाय घरची बाई; काय करूं मला काइ बी समजत नाइ बगा, " शक्य तितक्या संथपणें व संयमानें पण

विव्हलतेनें हे शब्द उच्चारीत शिवानें कोंडीबाचं कार्ड सुलभेच्या हातांत दिलं. "योक आपल्याकडला कुनी मोठा मनुक्क्ष्य दाक्तराबर्बर वार्डांत आला व्हता त्यानं वाचून मजकूर सांगतलान्."

सुलभेनें तें कार्ड वाचलं आणि शिवाच्या स्थितींत त्याला तें वाचून दाखविण्याचा, आणि तेंही जसंच्या तसं, असमंजसपणा करणाऱ्या मनुष्याबद्दलचा संताप तिच्या तोंडावर दिसूं लागला. पण तिनें लगेंच स्वतःला आवरलं आणि निदान शिवाच्या समोर तरी त्याला सांत्वनपर दोन शब्द बोलणं आवश्यक म्हणून ती त्याला धीर देत म्हणाली—

"हें बघ शिवा, पोलीसतपास चालू आहे. माझ्या ओळखीचे एक अधिकारी आहेत तिकडे त्यांना मी तार करतें. काळजी करूं नकोस. अन् परवां इथं आणखी जखमी लोक येणार आहेत तेव्हां तुला इथून हलावंच लागणार. मलाही आपल्या प्रांताला जायचंच आहे. तेव्हां परवां इथंच दुसरीकडे न जातां तूं आणि मी आपण बरोबर निघूं तिकडे जायला. जवळजवळ शेवटपर्यंत आपण बरोबर जाऊं; मला थोडंसं अगोदर उतरावं लागेल पण पळसखेड्याला लागणाऱ्या स्टेशनवर तुला ओळखीचे लोक भेटतील अन् तुला सहज घरीं जातां येईल."

शिवाचं अंतःकरण त्या सूचनेनें भरून आलं. एखाद्या इमानी कुत्र्याच्या आशाळभूत नजरेनें त्यानें सुलभेकडे बघितलं.

"समजलं शिवा, आतां काळजी नको करूंस बघ. नाहीं तर पुन्हां प्रवासांतला शीण जाणवेल."

" नाइ बाई, मी आतां चांगला घडधाकट झालों हाय नाइ कां ! "

सुलभेनें आपला राग जरी शिवापासून लपविला होता तरी तिच्या मनांतून तो गेला नव्हता. शिवापासून ती निघाली ती तडक डॉ. व्हॉन्स्कींच्या खोलींत. पण त्या खोलींत कुणीही नव्हतं. तिथून ती परतली आणि हॉस्पिटलच्या पडवींतून रागानें जात होती इतक्यांत मुख्य दरवाजाजवळ डॉ. व्हॉन्स्की हॉस्पिटलला भेट द्यायला आलेल्या एका सद्‌गृहस्थाला निरोप देत असलेले तिला दिसले. त्या सद्‌गृहस्थांची सुलभेकडे पाठ होती. त्यांच्या जवळ पण थोड्या अंतरावरून तिनें मोठ्यानें विचारलं–

" क्षमा करा, पण हें पत्र तुम्ही... "

तोंच भाई कुमार वळले आणि सुलभेला आपण कुणाला उद्देशून बोलत आहों याची जाणीव झाली. दोघांची दृष्टादृष्ट होतांच भाई कुमार किंचित् गोंधळले, वरमले, बावरले त्या अचानक भेटीनें. सुलभेनें मात्र आपलें वाक्य पुरें न करतां त्यांच्याकडे एक तीक्ष्ण तिरस्कार आणि संतापपूर्ण कटाक्ष टाकला आणि ती क्षणांत तिथून अदृश्य झाली ती पुन्हां कधीं भाई कुमारांना दिसली नाहीं.

—*—

# १५. तांबडी माती

अन्धाऱ्या पहांटेची वेळ होती. शिवाची गाडी चाकांच्या प्रत्येक फेऱ्याबरोबर पळसखेड्याकरितां ज्या रेल्वेच्या स्टेशनवर त्याला उतरायचं होतं त्या स्टेशनाच्या जवळ जवळ येत होती. दोन्ही बाजूंच्या अजून काळोखांत असलेल्या प्रदेशांतून वेगानें आपला मार्ग काढणाऱ्या त्या गाडीच्या रुळांवरील डब्यांच्या आणि चाकांच्या खड् खड् आवाजांत, क्वचित् आपल्या घरट्यांतच सकाळच्या चाहुलीनें अर्धजागृत स्थितींत फडफड करणाऱ्या पक्ष्यांची किल्बिल् लुप्त होत होती. झोंपेनें आलेल्या शारीरिक असहायतेंत गाडीच्या धक्क्याबरोबर इजिप्शिअन ममीप्रमाणें इच्छारहित हालचालींत डुलणारे प्रवासी डब्यांतल्या दिव्यांच्या प्रकाशांत एका विचित्र दृश्यांत अन्तर्भूत झाले होते, आणि त्या दृश्यांतून सबंध जीवनावर एक रूपकच रचीत होते. मधूनच कुणीतरी गाडीच्या धक्क्यानें अनिच्छया जागा होई, पण गाडी अजून चालतेच आहे असं पाहून पुन्हां निजे. एखाद्या स्टेशनवर गाडी उभी राहिली तर प्लॅटफॉर्मवरच्या कंदीलधारी पोर्टरच्या आवाजांत उमटलेलीं त्या स्टेशनच्या नांवाचीं अक्षरें झोंपेच्या दाट धुक्यांतून कांहीं प्रवाशांच्या संज्ञाप्रवाहांत अस्पष्ट पडसाद उमटवीत. ज्यांना त्या स्टेशनवर उतरायचं असे ते लोक गडबडीनें बरोबरीच्या उता-

रूंना जागें करून कसें तरी एकदां डब्याच्या बाहेर धांदलीनें पडत. पण बरेचसे प्रवासी जागे झाले तरी हें आपलं स्टेशन नाहीं अशी खात्री करून घेऊन पुन्हां निद्रावश होत; आणि लाल दिव्याचा हिरवा दिवा करणाऱ्या जादूगारानें खूण करतांच गाडी आपल्या चाकांना गति देई. आणि पुनश्च डब्यांतले इजिप्शिअन ममीज् शिथिलतेनें, विचित्रपणें, मंद झालेल्या दिव्यांच्या प्रकाशांत डुलायला लागत!

समोरच्या क्षितिजाची कडा किंचित् उजळली होती. एंजिनवरच्या मोठ्या शीर्षकंदीलांच्या प्रकाशाच्या झोतांत रेल्वेचा खडीचा रस्ता आणि दोन सर्पांसारखे रूळ भोंवतालच्या अंधारांतून वगळले जाऊन लख्ख चकाकत होते. पण क्षितिजाची कडा आणि रेल्वेचा रस्ता हीं दोन्ही दिसत होतीं फक्त एंजिनमधल्या ड्रायव्हरला. आणि त्यालाही खुद्द एंजिनच्या खालीं धगधगित लाल प्रकाशांत एकामागून एक क्षणांत येऊन क्षणांत अदृश्य होणारे रेल्वेच्या अखंड रस्त्यावरले खडीचे लहान लहान भाग आणि त्यांवर पडणाऱ्या ठिणग्या दिसत नव्हत्याच!

गाडीचा वेग पुन्हां एकदां हळू हळू कमी व्हायला लागला. आणि पळसखेड्याला लागणाऱ्या स्टेशनच्या प्लॅटफॉर्मवर एकेक डबा संथपणें येऊं लागला. त्याच प्लॅटफॉर्मवरला कंदीलधारी पोर्टर खड्या आवाजांत स्टेशनचें नांव उच्चारूं लागला. झोंपेच्या विरल थरांतून चांचपडत येणाऱ्या त्या अक्षरांची चाहूल पहांटेच्या गारव्यांत डुलकी घेणाऱ्या शिवाला लागली आणि तो खडबडून जागा झाला. घाईघाईनें त्यानें आपला बिस्तरा गुंडाळला आणि सामान उचलून

तो डब्याच्या खालीं उतरला. पुन्हां एकदां लाल दिव्याचा हिरवा दिवा करणाऱ्या जादूगारानें कांडी फिरवतांच गाडीनें शिटी फुंकली आणि ती आपल्या अप्रतिहत लोहमार्गावर एक एक चाक संथपणें पुढें टकलूं लागली.

शिवानें उतरून आजूबाजूस बघितलें तर झुंजुमुंजु झालं होतं. आणि पोर्टरच्या खुराड्यांतल्या कोंबड्यानें आरव द्यायला सुरवात केली होती. स्टेशनच्या प्लॅटफॉर्मवरच त्यानें आपला फौजी बिस्तरा आणि सामान ठेवलं आणि प्रातर्विधि आटोपून तो जरा हुशार झाला. तोंपर्यंत चागलंच फटफटायला लागलं होतं. आणि आसपासच्या प्रदेशांतील झाडंझुडुपं व घरें अंधाराच्या संदिग्धतेंतून आपआपल्या खऱ्या स्वरूपाची रूपरेषा अधिकाधिक स्पष्टतेनें दाखवूं लागले होते. आजारीपणांतून उठल्यानें शिवाला निराळी दृष्टि प्राप्त झाली होती म्हणा किंवा बरेच दिवसांच्या ताटातुटीनें त्याची कल्पनाशक्ति अधिक तरल झाली होती म्हणा, पण आसपासच्या एकेकाळीं परिचित असलेल्या दृश्यांत त्याला आज निराळीच अनोळखी शोभा आणि आपुलकी आढळत होती. त्यानें जवळचं सामान एका हमालाजवळ दिलं आणि दोन तीनच मैलांवर असलेल्या पळसखेड्याची वाट धरली.

मैल दीड मैल चालल्यावर त्याला जरा थकवा आल्यासारखा वाटला आणि निष्कारण भलताच ताण शरीरावर पडूं नये या उद्देशानें तो थोडा वेळ मध्येंच विश्रांतीसाठीं थांबला. रस्त्यावर माणसांची किंचित् चाहूल लागायला सुरवात झाली होती. भोंवतालीं

पसरलेलीं शेतं त्याला बाहत होतीं. वास्तविक कोंडोबाची–किंवा एकेकाळीं कोंडीबाची असलेली–जमीन तिथून दिसतही नव्हती. पण धरणीमातेचं हृदय अगाध तसंच अखंड आहे. ती आपल्या लेकरांत कोण कुठल्या भागाचा धनि आहे किंवा शेतकरी आहे या अनुमानानें भेदभाव करीत नाहीं. शेतकरी म्हणजे काळ्या जमिनीचा मालक तद्वत् मुलगा! तो कुठेंही गेला तरी तिथल्या काळ्या जमिनीची माती त्याला आईच्या प्रेमानें बहाणारच!

शिवा पुन्हां उठला आणि त्यानें चालायला सुरवात केली. आणखी अर्धा मैल तो चालला असेल नसेल तोंच समोरून एक म्हातारी व्यक्ति येत आहे असं त्यानं पाहिलं. सकाळच्या प्रकाशांत ती व्यक्ति कोण असावी याचा त्यानें लांबून अंदाज केला. पण ती व्यक्ति खालीं मान घालून चालत असल्यानें आपला अंदाज बरोबर आहे कीं नाहीं याची खात्री शिवाला त्या व्यक्तीच्या साधारण जवळ गेल्यावरच झाली. ती खात्री झाल्याबरोबर त्यानें अभिवादन केलं–

"सलाम, साब."

"राम राम, कोन है तुम्?" सैनिकाच्या पोषाखांतील शिवाला न ओळखून त्या व्यक्तीनें विचारलं.

"मी शिवा नवं कां–शिवा कोंडीबा."

"शिवा, तुम् फौजमेंसे आये हैं?" असं म्हणून खानबहादुर महंमद हुसेनांनीं उजव्या हातांतला सोटा डाव्या हातांत घेतला आणि शिवाशीं हार्दिक हस्तांदोलन केलं. खानबहादुर महंमद हुसेन अजून त्या जिल्ह्याचे डी. एस्. पी. होते. आणि जिल्ह्यांतल्या

नेहमींच्या दौऱ्यांतला त्यांचा मुक्काम सध्यां पळसखेड्यासच होता. सकाळच्या फिरण्याकरितां ते रोज नियमानें बाहेर पडत आणि तासभर चालून येत. शिवानें त्यांच्या चेहऱ्याकडे पाहतांच त्याला पूर्वीच्या एका प्रसंगाची आठवण झाली. खानबहादुरांच्या चेहऱ्यावर पूर्वीचंच गंभीर तज होतं. पण त्यांचे केंस थोडे जास्त पांढरे झाले होते. डोळ्यां-भोंवतालच्या आणि गालावरच्या रेघा जरा जास्त खोल झाल्या होत्या. पण त्या पलीकडे त्यांच्या रुबाबांत फारसा फरक पडला नव्हता. शिवा फौजेंत गेला आहे हें त्यांना अगोदरच ठाऊक होतं, पण त्याची फौजेंतल्या पोषाखांत अशी गांठ ही प्रथमच पडत होती. खानबहादुरांच्या आवाजांत एका कारुण्यपूर्ण आनंदाची छटा उमटली आणि ते शिवाला उद्देशून म्हणाले—

"क्यां, कैसी है हालत? कहांसे आया तूं?"

"कलकत्त्यास्नी, साब. तथं इस्पितळांत व्हतो. अन् आतां रजा मिळाली घरला यायला योक महिनाभर."

"अच्छा. जखमी हो गया था अंऽ?" खानबहादुरांनीं सहानुभूतीनें विचारलं. पण त्यांच्या अंतःकरणांत एक विलक्षण आर्तता बोंचत होती. "चलो, हम् भी वापिस जायेंगे तुमारे साथ आज. कहों हमको कहों कुच लढाईकीं बातें." असं म्हणून ते शिवाबरोबर परत फिरले. सारजा बेपत्ता झाल्याचं त्यांना माहीत होतं, पण 'अशुभस्य कालहरणम्' म्हणून त्यांना ती बातमी सुसंस्कृत मनाच्या सूज्ञ सहानुभूतीनें शिवापासून त्यांच्या समजुतीप्रमाणें लपवून ठेवावयाची होती. पण शिवाच्या मनःस्थितीची काळजी

करणाऱ्या खानबहादुरांची स्वतःची मनःस्थिति फारशी आनंदी नव्हती. आणि त्यांनींच काढलेल्या लढाईच्या विषयाच्या पहिल्या आघातानें अभावितपणें त्यांच्या हृदयाची जखम उघडली गेली.

"हां साब, जरा जखमी जालों वाईच इतकासा. कोपराला जरा जास्त जाली व्हती. आपला शत्रु यनार व्हता चाल करून-शान् अन् आमास्नी बगल रोखायची होती. जरा संगीन लावून पुढं गेलों गोळीबारांत. त्या झटापटींत ह्यो जरा हात दुकावला. पन् आतां बरा हाय अक्षी." असं शिवा म्हणत होता तोंच त्याला खानबहादुरांच्या मुलाची आठवण झाली. आणि त्यानें त्याचं कुशलवृत्त विचारलं. दमदार, गंभीर पण कांपऱ्या आवाजांत खानबहादुर संयमित दुःखानें उद्गारले—

"बहोत अफसोस की बात है शिवा, लेकिन् वो अल्लाके घर चले गया है. बहोत उमदा लडका था और सबको बहोतही प्यार था. उसकी मा और बिबी रोती हैं. लेकिन् मैं समझतां हूं के जो खुदाकी मर्जी वोही होना अपने अंदाजसेभी अच्छाही मानना चाहिये. तुम्, हम्, और ये सब दुनिया खुदाकेही परवरदिगर है!"

शिवाच्या हृदयाला चटका बसला. सहानुभूतीची शाब्दिक भाषा शिवाला अवगत नव्हती पण त्याच्या डोळ्यांत तिचं प्रतिबिंब पडलं होतं. त्यानंतर त्या दोघांपैकीं कुणीही बोललं नाहीं. पळस-खेड्याच्या बाहेरच्या आपल्या तंबूजवळ आल्यावर खानबहादुरांनीं शिवाचा निरोप घेतला.

"राम राम, शिवा. खुदा तूझे सलामत रखो."

" सलाम, साब. सलाम. "

शिवाच्या विषण्णतेंत त्या बातमीनें अधिकच भर घातली. या जगांत कोण कुणाचं असतं ! आपलं स्वतःचं दुःख कांहीं कमी नाहीं. कोण खानबहादुर आणि कोण त्यांचा मुलगा ! आणि मृत्यू कुणाला टाळतां आला आहे ? शिवाय रणक्षेत्रावरलीं दृश्यें शिवाला कांहीं अपरिचित नव्हती. तरीही खानबहादुरांचा मुलगा लढाईत कामास आला हें ऐकून त्या सैनिकाचं मन भांबावलं. हिंदुस्थानांतल्या असंख्य अडाणी शेतकऱ्यांपैकीं शिवा एक होता. जीवनविषयक दृष्टीकोन वगैरे भाषा त्याला सांगूनही कळली नसती. त्याच्या मनांतील कल्पना, विचार, भावना यांना तत्त्वज्ञानाचे पैलू पडलेले नव्हते; किंवा त्यांच्या विवक्षित आकृतींनीं जीवनाचा सलग असा भव्य नकाशा किंवा आराखडा तयार झालेला नव्हता. अशा परिस्थितींत खानबहादुरांच्या मुलाचा रणांगणावरील मृत्यू; आपण जखमी झालों असतां आपल्याला पाठीवर घालून रणक्षेत्रावरून आणणारा ब्रिटिश अधिकारी; हॉस्पिटलमध्यें आपल्याला जवळ जवळ जीवदान देणारा रशियन डॉक्टर; सारजेला पळवून नेणारे बदमाष; वत्सलतेनें जातगोत, धर्मवर्ण विसरून आपली शुश्रूषा करणारी रॉबिन्सनूबाई आणि लिखितेबाई; मारुतीच्या देवळावर आणि मशिदीवर बॉंब टाकणारा शत्रूचा वैमानिक; या सर्वांनीं त्याच्या भोळ्या मनःपटलावर एकच गोंधळ उडवून दिला. त्याच्या भावनाविचारांच्या आकृति एकमेकांत मिसळून विरघळल्या. आणि त्यांच्या गाळाचा एक आकृतिशून्य थर शिवाच्या संज्ञा-प्रवाहाच्या तळाशीं बसला.

मातीचा गाळ हातांत घेऊन त्यांतून गणपतीचा साक्षात्कार घडवून देणारा दैवी प्रेषित, किंवा त्यांतून सुंदर पुतळा निर्माण करण्याची किमया साध्य झालेला मानवी कलावंत जगाच्या दुर्भाग्यानें अजूनही विरळाच असतो!

पळसखेड्याच्या ओळखीच्या रस्त्यांवरून शिवा आपल्या घराच्या रोखानें मंदपणें जात होता. पूर्वेला सूर्याचं आरक्त बिंब क्षितिजाची कड धरून वर येत होतं. पश्चिमेला एकच एक शेवटपर्यंत टिकाव धरून राहणारा तारा आतां लुप्त झाला होता. रस्त्यांतल्या मारुतीच्या देवळावरून जातांना शिवानें त्या भव्य, शेंदूरानें फांसलेल्या मूर्तीकडे एकवार बघितलं. परंपरागत संस्काराच्या संवयीनें त्यानें त्या मूर्तीला नमस्कार केला, पण त्याचं हृदय आज रितं होतं. अव्यक्त प्रश्नांकित मुद्रेनें आणि श्रद्धापूर्ण उपहासाच्या नजरेनें तो त्या भव्य शिलामूर्तीच्या पुढून चालूं लागला. थोडंसं पुढें गेल्यावर तो बलभीम आखाड्याच्या जवळ आला.

आखाड्याला पहातांच मात्र त्याचं हृदय एका अननुभूतपूर्व भावनेनें उचंबळून आलं. आदल्या रात्रीच्या पावसानें भिजलेली आखाड्यांतील तांबडी माती अजून ओलीच होती. सकाळच्या सूर्याच्या आरक्त प्रभेनें तिचा ओलसर तांबडा रंग अधिकच खुलून दिसत होता. त्या ओल्या तांबड्या मातीला पाहतांच शिवाच्या मनःचक्षूंसमोर अनेक मैलांच्या अन्तरावर आपल्या रक्तानें तांबड्या झालेल्या थोड्याशा मातीचं दृश्य विद्युत्वेगानें येऊन गेलं.

—सारजा गेली.

—रस्त्यांत कुणीतरी म्हणालं होतं कोंडीबाची जमीन गेली म्हणून.

पण शिवा आखाड्याच्या एका सीमेवर बसून त्यांतल्या तांबड्या मातीकडे पाहूं शकत होता; ती तांबडी माती हातांत घेऊन क्षणभर तिच्याशीं लडिवाळपणानें खेळूं शकत होता! स्वतःच्या रक्तानें एकीकडे थोडीशी माती तांबडी केली त्याचं सार्थक झालं कीं आज निर्वेधपणानें, शांतपणानें पळसखेड्याला येऊन ह्या आखाड्यांतल्या तांबड्या मातीचा रोमांचकारक स्पर्श हाताला अनुभवतां आला! धरणीमाता शेतकऱ्यांची आई. आज तिचं पावित्र्य रक्षण करण्यांत तिचा एक मराठा पुत्र अंशतः पण तत्परतेनें आणि शौर्यानें भागीदार ठरला होता!

शिवानें आखाड्यांतल्या तांबड्या मातीला हात लावला आणि तोच हात आपल्या मस्तकाला लावून त्यानें तिला प्रणाम केला. इतर दुःखांनीं विव्हल झालेल्या शिवाच्या मनाला एका अपूर्व अभिमानाचं, सार्थक्याचं वैभवशाली समाधान आणि सांत्वन लाभलं!

शेतकऱ्याला जमीन म्हणजे माता.

सामान्यतः काळी जमीन...

...वेळ पडल्यास तांबडी!

—✻—

# :: आमचें आगामी प्रकाशन ::



| | |
|---|---|
| हिरवे कंदील : | अनंत काणेकर |
| अविस्मरणीय व्यक्ती : | ना. धों. ताम्हनकर |
| थोरांच्या सहचारिणी : | कमला फडके |
| नवा प्रकाश : | वि. वा. पत्की |
| प्रामाणिक : | ना. धों. ताम्हनकर |
| सुमनें : | का. द. सबनीस |
| विशाखा ( २ री आ. ) : | कुसुमाग्रज |
| चांभाराचा देव : | खांडेकर |
| मुका मार : | ,, |
| श्री. कृ. कोल्हटकर— : ( व्यक्ति व वाङ्मय ) | ,, |
| दोन नद्या : | ,, |
| आगरकर—(व्यक्ति व वाङ्मय) : | ,, |
| चाळिशी : | ,, |
| पडद्याआड—( चित्रपटचर्चा ) : | ,, |

: प्रकाशक :

दा. ना. मोघे, कोल्हापूर.